# साहित्य आणि संशोधन.

लेखक

प्रा. रघुनाथ महारुद्र भुसारी
एम ए, एल एल बी

मराठी विभाग प्रमुख
उस्मानिया विद्यापीठ,
हैद्राबाद दक्षिण

१९५१

मूल्य ) ( ३ रु.

# प्रस्तावना

प्रस्तुतनिबध अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद ( All India Oriental Conference ) आणि इतर काही सशोधन मडळाच्या वार्षिक अधिवेशनात वाचण्यात आले त्यापैकी, मुकुदराजाचा कालनिर्णय हा निबध काही वर्षापूर्वी माझ्ञ नागपुरात वास्तव्य असताना मध्यप्रात सशोधन मडळ या सस्थेच्या वार्षिक समेलनासाठी मी लिहिला मडळाच्या सभासदास हा लेख पसंत पडला. विशेषत शारगधर आणि जैत्रपाल याचा ऐतिहासिक दृष्टीने करण्यात आलेला शोध हा भाग त्याना नवीन वाटला हा निबध पुढे सह्याद्रि मासिकात प्रसिद्ध झाल्यावर इतरहि काही विद्वानानी या विषयावर आपले विचार निरनिराळ्या नियतकालिकातून माडले परतु सारगधर व जैत्रपालासबधाने त्यानी विशेष विचार केला नाही असे वाटते. असे का व्हावे हे समजत नाही मुकुदराजाचा काल निश्चित करावयाचा असल्यास ह्या दोन व्यक्तीना वगळून चालणार नाही किबहुना त्याच्या ऐतिहासिक शोधावरच मुकुदराजाचा कालनिर्णय मोठ्या प्रमाणात अवलंबून आहे असे मला वाटते

महानुभाव आणि लिगायत पथ हा निबध मी भारत इतिहास सशोधक मडळ पुणे या संस्थेच्या वार्षिक समेलनात वाचला लिगायत पथाने कर्नाटकातील तत्कालीन समाजात क्रातिकारक विचाराचा प्रसार केला तशाच प्रकारचे कार्य महाराष्ट्रात महा-

नुभाव पथाने करण्याचा प्रयत्न केला प्रम्तुत निबधात त्याच्या मध्ये आचारविचाराच्या बाबतीत किती साम्य आहे हे तुलनात्मक दृष्टीने दाखविण्याचा प्रयत्न केला आहे द्राविड सीमावरील मराठी आणि देवगिरीचे यादव आणि धार्मिकपथ हे दोन निबध भारतीय प्राच्यविद्या परिषेच्या हैदराबाद आणि मुबई येथील अधिवेशनात मी वाचले प्राचीन हस्तलिखित पोथ्या आणि शिलालेख याच्या सशोधनासाठी मला काही दिवस फिरण्याचा प्रसग आला या माझ्या प्रवासात भाषेच्या शास्त्रीय अभ्यासाला उपयुक्त असे बरेच साहित्य मला मिळाले हैद्राबाद सस्थानातील मराठवाडा, तेलगण आणि कर्नाटक हे विभाग प्राचीन वस्तु-सशोधनाच्या दृष्टीने जसे समृद्ध आहेत तसेच भाषाच्या शास्त्रीय अभ्यासाला देखील या भागात मबलक क्षेत्र आहे या दृष्टीने मी अल्पसा प्रयत्न केला आहे मराठी भाषेच्या अभ्यासकाना हा प्रयत्न पसत पडेल असे वाटते महानुभाव पथाचे सस्थापक श्रीचक्रधरप्रभु याच्या चरित्रावर आतापर्यंत बरेच लिखाण प्रसिध्द झाले आहे महानुभावमहताना श्री चक्रधरप्रभु हे अवतारी पुरुष असल्यामुळे त्याचे कोणतेहि कृत्य समर्थनीय वाटते इतकेच नव्हे तर पथाबाहेरील टीकाकाराच्या आक्षेपाना तशाच पध्दतीने ते उत्तर देतात याच्या उलट पथाबाहेरील काही टीकाकाराची टीका घड्याळा-च्या लबकाप्रमाणे विरुध्द बाजूला झुकल्यासारखी वाटते तेव्हा पूर्वग्रहदोष अथवा पक्षाभिनिवेश याच्या भानगडीत न पडता एका धर्मसस्थापकासबधाने योग्य आदर ठेवून मी आपले विचार माडले आहेत पथीय वाचकाना ते पसत पडतील अशी आशा आहे प्राचीनमराठी काव्यात रुक्मिणीस्वयवराची लोकप्रियता

फार आहे बहुतेक कवीनी या कथाप्रसगावर रचना केली आहे परतु श्रीएकनाथाच्या काव्या इतकी इतराना प्रसिध्दि मिळाली नाही तेच स्थान नरेंद्राच्या काव्याला महानुभाव वाङमयात आहे हे दोन्ही कवी जसे भिन्नपथीय आहेत तसेच साहित्य शास्त्राच्या क्षेत्रात भिन्न विचाराचे आहेत, त्याना एकत्र आणून त्याच्या ग्रथातील काव्य गुणाचा तुलनात्मक दृष्टीने विचार करणे बरेच उद्‌बोध वाटते,तशा प्रकारचा प्रयत्न मी श्री एकनाथ आणि नरेंद्र पडित या लेखात केला आहे प्राचीनलेख आणि पोथ्या याच्या शोधासाठी मला जो प्रवास करावा लागला त्या प्रवासात इतर लेखाप्रमाणे हातनूरचा शिलालेख मला उपलब्ध झाला हा शिलालेख माझे स्नेही श्री. रामचद्रराव काटे वकील सेलू यानी माझ्या नजरेस आणला. भारत. इ स मडळात वार्षिक समेलनात मूळ ठशासह त्यावरील लेख वाचण्यात आला त्यानतर मडळाचे एक कार्यवाह डॉ मो. ग दीक्षित यानी तो लेख आपल्या पराग मासिकात प्रसिध्द केला प्रस्तुत पुस्तकात मूळठशाचा ब्लॉक तयार करणे शक्य न झाल्यामूळे लेखाबरोबर जोडण्यात आला नाही त्याबद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे या लेखाचा सग्रह पुस्तक रूपाने छापून दिल्याबद्दल माझे स्नेही श्रीकृपा मुद्रणालयाचे व्यवस्थापक श्री यशवतराव जोशी याचा मी आभारी आहे

उस्मानिया विद्यापीठ,
हैद्राबाद दक्षिण

र म. भुसारी

# अनुक्रमाणिका.



# मुकुदराजांचा कालनिर्णय

प्राचीन मराठी वाङमयातील कवीपैकी ज्याच्या काल-निर्णयासबधी आतापर्यत अनेकवार चर्चा झाली आहे किबहुना अद्यापहि नियतकालिकातून चालू आहे, त्यामध्येच सुप्रसिद्ध सतकवि 'विवेक-सिधु कार मुकुदराज याची गणना करण्यास हरकत नाही परपरागत आख्यायिका व लोकप्रसिद्धि यावर श्रद्धा ठेवणाऱ्या बहुजनसमाजाने मकुदराजाना आदिकवीची पदवी पूर्वीच बहाल केली आहे परतु चिकित्सक विद्वानामध्ये यासबधी दोन पक्ष झालेले उघड दिसतात 'विवेकसिधू'च्या काही हस्तलिखित जुन्या पोथ्यातील ' शके अकरा दाहोत्तरू । साधारण सवत्सरू । राजा शारगधरू । राज्य करी ।। " या ओवीतील शकाचा आधार घेऊन मुकुदराज हे शके अकराशे दहाच्या सुमारास होऊन गेले असे एका पक्षाचे मत आहे, ( भावे—'महाराष्ट्र सारस्वत' भाग पहिला, पान ३३-३४ आणि ह भ प पागारकर 'मराठी वाङमयाचा इतिहास' खड १ पान ३८३) याच्या उलट दुसऱ्या पक्षाचे असे म्हणणे आहे की, मुकुद या नावाचे कवि आपल्याकडे अनेक होऊन गेले आहेत ही गोष्ट क्षणभर दृष्टीआड केली, तरी विवेकसिधूतील भाषेच्या अर्वाचीन स्वरूपाकडे दुर्लक्ष करून निव्वळ काही हस्तलिखित पोथ्यातील शकावरून (प्रकाशित प्रतीत वरील ओवी आढळत नाही) मुकुदराज हे इतक्या प्राचीन

★ 'मध्यप्रात सशोधन मडळ,' नागपूर या सस्थेच्या वार्षिकोत्सवप्रसगी वाचलेला निबध

काली होऊन गेले असे म्हणणे वस्तुस्थितीला धरून होणार नाही शके अकराशे दहा हा काल अर्थात ज्ञानेश्वरीपूर्वी एका शतका-इतका प्राचीन असल्यामुळे 'विवेकसिधू'तील भाषेचे स्वरूप शके ११२८ तील पाटणच्या शिलालेखाइतके जरी प्राचीन नसले तरी राजवाडी ज्ञानेश्वरीप्रमाणे असले पाहिजे तसा प्रकार विवेकसिधू-तील (प्रकाशित प्रत) भाषेत मुळीच दिसत नाही उलट एक-नाथाच्या भाषेपेक्षाहि ती अर्वाचीन वाटते

याप्रमाणे दुसऱ्या पक्षाच्या म्हणण्यात सत्याचा थोडाबहुत अश आहे यात शका नाही तथापि ग्रथातील भाषेचे स्वरूप हीच एक गोष्ट कोणत्याहि कवीचा काल निश्चित करण्यास निर्णायक होईल असे वाटत नाही भाषेबरोबर इतर भाषाचा अथवा ग्रथाचा त्या ग्रथावर झालेला परिणाम, त्यात वर्णिलेली लोकस्थिति, समकालीन अथवा नतरच्या ग्रथावर त्या ग्रथाचा झालेला परि-णाम, ऐतिहासिक उल्लेख इत्यादि साधनाकडे लक्ष देणे आवश्यक असते या दृष्टीने प्रयत्न करून मुकुदराजाच्या कालावर कसा काय प्रकाश पडतो, हे प्रस्तुत निबधात पाहण्याचे योजिले आहे

**'विवेकसिधू'च्या पोथ्या**

आपल्याकडे मुद्रणकलेचा प्रसार होण्यापूर्वी जुन्या पोथीची नक्कल करताना नक्कल करणाऱ्याच्या हातून जे अनेक दोष होत असत, त्यापैकीच भाषेचे अर्वाचीकरण हा एक होय ज्ञानेश्वरीची एकनाथी प्रत हे या दोषाचे सर्वाना माहीत असलेले एक उदाहरण म्हणून देता येईल ज्ञानेश्वरीसारख्या वारकरी साप्रदायातील प्रमाणभूत 'काव्या रावो'ची जेथे ही स्थिति दृष्टीस पडते, तेथे श्रद्धावान् साप्रदायिक भक्ताचे साहाय्य नसलेल्या विवेकसिधूची इतरेजनाकडून किती निष्काळजीपणाने नक्कल होत असेल याची

वाचकास सहज कल्पना करता येईल अशा तऱ्हेने नक्कललेली एक पोथी एका प्रकाशकाला मिळाली व विशेष संशोधनाच्या भानगडीत न पडता त्याने ती प्रसिद्ध केली विवेकसिंधूच्या प्रकाशित प्रतीतील (प्र देव, पुणे) भाषेचे याप्रमाणे अर्वाचीन स्वरूप दिसत असले तरी त्यामध्ये प्राचीनत्वाला पोषक अशा एकदोन गोष्टी प्रामुख्याने आढळून येतात

## फारशीचा अभाव आणि कानडीचे वर्चस्व

ज्ञानेश्वरी अथवा प्राचीन महानुभावीय ग्रथ याचा एक विशेष असा आहे की, या ग्रयाची रचना मुसलमानाचा दक्षिणेत प्रवेश होण्यापूर्वी झाली असल्यामुळे त्यामध्ये फारशी–अरबी शब्द प्राय आढळत नाहीत अशाच शुद्ध स्वरुपात विवेकसिंधूची ही छापील प्रत दृष्टीस पडते ज्ञानेश्वरीत ‘पोतडी’ (कुंटे याची ज्ञानेश्वरी, अ १४ ओवी ४२०) शिशुपालवधात ‘जाहरी’ (ओवी २७२) अशासारखे फारशी ठशाचे शब्द अपवादादाखल तरी आढळतात परंतु विवेकसिंधूत अशा प्रकारचा अद्याप एकहि शब्द आढळला नाही ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे याशिवाय ज्ञानेश्वरकालीन वाङमयाचे दुसरेहि एक वैशिष्टय आहे. ते हे की, या ग्रथात द्राविडी शब्दाचा, विशेषत कानडी शब्दाचा, भरणा प्रामुख्याने आढळून येतो उदाहरणार्थ–मातु, हुडे, आरोगू, बोनी, पौळी, पहुडणे, बिढार, बागे, हरळु, हडप, उळीग, गुडे, उडी, उरगुडे, टाळी, राडी, मेचु इ असे अनेक कानडी तेलगी शब्द त्याच स्वरूपात किंवा थोड्या फार फरकाने ज्ञानेश्वरी, शिशुपालवध, लीळाचरित्र इ प्राचीन ग्रथात सापडतात या दृष्टीने विवेकसिंधूचा अभ्यास केल्यास त्यामध्येहि द्राविडी ठशाचे अनेक शब्द आढळून येतात त्यापैकी, काही येथे देतो –

ओळघे (पान ६ ओवी २७) कानडी शब्द ओळगिसु–स्वाधीन होणे कडसणी (पा ८ ओ ४१) कानडी धातु कड–घुसळणे गदागेळ (पूर्वार्ध, प्रकरण ७) तेलगी शब्द गदरगोळमु अर्थ तोच उडी ( उत्तरार्ध, प्र ११ ओ ७३ ) कानडी श. उडे–गोळा बिढार (पूर्वार्ध, प्र २) का बिडार–उतरण्याची जागा

यावरून विवेकसिंधूच्या अशाहि स्वरूपात प्राचीन असे काही अवशेष राहू दिल्याबद्दल नक्कलकाराचे थोडे तरी आभार मानावयास हरकत नाही !

## ‘विवेकसिंधू’ची जुनी प्रत

सुदैवाने अलीकडे विवेकसिंधूच्या बऱ्याच हस्तलिखित पोथ्या उपलब्ध झाल्या आहेत अशीच एक जुनी पोथी यवतमाळ-च्या शारदाश्रमात मला पाहावयास मिळाली विवेकसिंधूच्या प्राचीन स्वरूपाची कल्पना येण्याकरिता सदर पोथीतील तीन ओव्या येथे देतो––

येसा शीक्षाचा सदेहो । आइकोनि उठीला स्नेहो
मग सर्वज्ञाचा रावो । बोले श्रीगुरुस्वामी ॥६॥
आज्ञान मिथ्यापूर्वक ज्ञान यैसे हे अविद्येचे लक्षण ।
म्हणौनि तेहि साभास हे खुण । वेदाती बोलिजे ॥११।
वेदागत्वेचि प्रमाणे । होती की येरे दरुशने ।
तरी सादनेचि साध्य कवणे । बोलिजैल ॥ १८ ॥

(‘विवेकसिंधु पूर्वार्ध, प्रकरण सातवे)

सदर ओव्यातील सदेहो, स्नेहो, रावो ही नामाची ओकारान्त रूपे, तसेच म्हणौनि, बोलिजे, बोलिजैल ही क्रियेची रूपे याचे ज्ञानेश्वरीतील (राजवाडे प्रत) त्या त्या रूपाशी किती साम्य आहे याची वाचकास सहज कल्पना करता येईल

अलीकडे महाराष्ट्रात भाषेच्या दृष्टीने प्राचीन ग्रंथाचे संशोधन सुरू झाले असून राजवाडी ज्ञानेश्वरीप्रमाणे जुन्या ग्रंथाच्या नवीन आवृत्ति प्रकाशित करण्यासंबंधी विद्वानांचे प्रयत्न चालू आहेत अशाच प्रकारचे संशोधन मुकुंदराजाच्या विवेकसिंधु संबंधाने झाल्यास त्या ग्रंथावर भाषेसंबंधी आज जे आक्षेप घेतले जातात त्यांचे बरेच निर्मूलन होईल असे वाटते

**विवेकसिंधूचा इतर ग्रंथावर झालेला परिणाम**

मुकुंद या नावाचे कवि जरी अनेक होऊन गेले असले, तरी विवेकसिंधुकार मुकुंदराजाखेरीज बाकीचे सर्व एकनाथानंतरचे आहेत, ही गोष्ट ज्ञानकोशातील त्यांच्याविषयी दिलेल्या माहितीवरून सिद्ध होते यावरून ज्याअर्थी एकनाथाच्या ग्रंथात ज्ञानेशा प्रमाणे मुकुंदराजाचा पूर्वकालीन कवि म्हणून उल्लेख नाही त्या अर्थी त्याचा काल एकनाथानंतरचा असला पाहिजे असा एक आक्षेप आहे परंतु हा आक्षेप तितका सबळ दिसत नाही मतमालिका नावाचा एकनाथाचा एक अभंग प्रसिद्ध आहे त्यात ज्ञानेश्वरानंतर मुकुंदराजाचा उल्लेख आढळतो असे श्री आजगावकर म्हणतात ('कवि चरित्र'भाग १ ) याशिवाय कृष्णदयार्णव,श्रीधर, महिपति या तिघांनी आपापल्या ग्रंथात मुकुंदराजाचा उल्लेख केला आहे पण याहिपेक्षा मुकुंदराज हे एकनाथापूर्वी होऊन गेले हे सिद्ध करण्याला दुसरी एक बाजू आहे समर्थाच्या दासबोधाचा काल एकनाथानन्तरचा असल्यामुळे विवेकसिंधूच्या त्या ग्रंथावरील झालेल्या परिणामासंबंधी विचार न करता पंधराव्या शतकातील सरस्वतीगंगाधराच्या गुरुचरित्राकडे वळू विवेकसिंधु आणि गुरुचरित्र या दोन ग्रंथात कित्येक कल्पनाच काय, पण काही ओव्या थोड्या फरकाने सारख्या आढळतात भारत–इतिहास

सशोधक– मडळाच्या इतिवृत्तात ( शके १८३५ पृष्ट २८२ ) अशा प्रकारची साम्यस्थळे एका लेखकाने दाखविली आहेत तेव्हा त्यासबधी अधिक चर्चा न करता येथे फक्त एकच सूचना करतो सरस्वती गगाधर हा कर्नाटकातील रहिवासी असल्यामुळे सामान्यत महाराष्ट्रीय लेखकाप्रमाणे मराठी भाषेवर त्याचे प्रभुत्व नसणार हे उघड आहे ग्रथारभीच " न कळे ग्रथ प्रकार। नेणे शास्त्राचा विचार । भाषा न ये महाराष्ट्र । म्हणुनी विनवी तुम्हासी ॥" ( गुरु चरित्र अ १ ओवी ३५ ) अशी कबुली तो स्वत च देतो यावरून तत्काली वेदान्त-विषयावर सर्वमान्य झालेल्या विवेकसिधुसारख्या स्वतत्र ग्रथाचे त्याने अनुकरण केले हे उघड आहे नृसिहसरस्वतीच्या समाधि-शकावरून ( शके १३८० हा काल आता निश्चित झाला आहे) पधराव्या शतकाचा पूर्वार्ध हा जरी गुरुचरित्राचा रचनाकाल धरला तरी पधराव्या शतकापूर्वीच अर्थात चौदाव्या शतकात किवा त्यापूर्वी मुकुदराज होऊन गेले असले पाहिजेत, असे म्हणण्यास हरकत नाही '

## मुकुदराज व ज्ञानेश्वर—साम्यस्थळें

मुकुदराजाच्या 'परमामृत' ग्रथावरून ज्ञानेश्वराना 'अमृतानुभव हा ग्रथ रचण्याची कल्पना सुचली असावी असे प्रो रा द रानडे याचे मत आहे ('ज्ञानेश्वर वचनामृत' प्रस्तावना) परतु नामसादृश्याशिवाय दुसरा कोणताहि पुरावा या कल्पनेला पोषक दिसत नाही तसेच ज्ञानेश्वरीमध्ये विवेकसिधु हा शब्द विशिष्टार्थी नसून सामान्यार्थी योजिलेला असला तरी या दोन ग्रथकारामध्ये साम्यस्थळाचा प्राय अभाव आहे असे मात्र म्हणता येणार नाही निदान 'विवेकसिधु' आणि 'अमृतानुभव' या ग्रथासबधाने तरी असे विधान करता येणार नाही 'विवेकसिधू'च्या उत्तरार्धातील

दहावे प्रकरण आणि 'अनुभवामृता'तील पाचवे प्रकरण याच्या मथळ्याचे नाव 'सच्चिदानद-पदत्रयविवरण" हे एकच आहे. इतकेच नाही तर त्या दोन्ही प्रकरणातील कल्पनामध्ये परस्पर विलक्षण साम्य दृष्टीस पडते अशा साम्यस्थळापैकी काही दृष्टात पुढे देतो—

**विवेकसिधु**

शुद्ध आणि प्रकाशमय । शितलता मिळूनी पदत्रय ।
तरी चद्र तव अद्वय सचला असे । १४ ।
शुभ्र तोचि मृदू । मृदू तोचि मकरदू ।
परी कर्पूर तव अभेदु । एकला असे ॥ १६
श्वेत तैसीच नम्र नम्र तीचि मधुर
मधुर तीचि साखर वेगळी नसे । १० ।

**अमृतानुभव**

शुक्ल पक्षीच्या सोळा दिवसा वाढती कळा ।
परि चद्र मात्र सगळा । चद्री जेवी । ८ ॥
उजाळ दृति मार्दव । या तिही तिही उणीव
हे देखिजे सावेव । कापुरी एकी । ३
द्राव गोडी पीयूष । पीयूखचि जेवी । २

ज्ञानेश्वरीची रचना पूर्ण झाल्यावर सद्गुरु निवृत्तिनाथानी ज्ञानेश्वराना विवेकसिधूसारखा स्वतत्र ग्रथ रचण्यास आज्ञा केली व तदनुसार त्यानी अमृतानुभव हा स्वतत्र ग्रथ रचिला अशी एक आख्यायिका आपल्याकडे प्रसिद्ध आहे या आख्यायिकेस वरील साम्यस्थळे पोषकच होतील असे वाटते

**जैत्रपाल व शारगधर याचा शोध**

विवेकसिधूतील परकीय शब्द, हस्तलिखित पोथीतील भाषे-

चे जुने स्वरूप आणि इतर ग्रथाबर विवेकसिधूचा झालेला परि-णाम या साधनाच्या आधारे मुकुदराजाचा काल किती प्राचीन ठरतो यासबधी आतापर्यंत विवेचन झाले आता यापुढे जयतपालादि ज्या व्यक्तीचा उल्लेख विवेकसिधूत आढळतो, त्याचा इतिहासात कोठे शोध लागतो किवा नाही हे पाहू

विवेकसिधूच्या काही हस्तलिखित पोथ्यातील ( भा इ स म सग्रह) "शके अकरा दाहोत्तरू । साधारण सवत्सरू । राजा शारगधरू । राज्य करी" ही महत्वाची ओवी प्रकाशित प्रतीत आढ-ळत नाही हे मागेच सागितले आहे तरी पण प्रकाशित प्रतीत "नृसिहाचा बल्लाळ । तयाचा कुमर जयतपाळ । तेणे करविला गदारोळ । ग्रथरचनेचा" अशी एक दुसरी ओवी सापडते यापैकी पहिलीत उल्लेखिलेला शारगधर अथवा दुसरीतील जयतपाल याचा महाराष्ट्राच्या तत्कालीन इतिहासात कोठेच पत्ता लागत नाही देवगिरीच्या यादववशात जयतपाळाचे नाव आहे, परतु नृसिह-बल्लाळाचा त्याबरोबर उल्लेख नाही असाच प्रकार शारगधरा-सबधाने झाला आहे यावरून एक तर या नावाच्या व्यक्ति मुळी अस्तित्वात नसतील किवा होऊन गेल्या असल्या तरी अप्रसिद्ध असतील असे म्हणण्याची आता वेळ आली आहे सुदैवाने अली-कडे सरस्वतीच्या मदिरातील महानुभावीय मराठी वाङमयासार-ख्या अज्ञात दालनाचा शोध लागल्यामुळे यादवकालीन धार्मिक व सामाजिक परिस्थितीवर अधिकाधिक प्रकाश पडत आहे

आपल्या ग्रथकारानी मुकुदराजाच्या चरित्रासबधी नावा-पलीकडे माहिती दिली नसली तरी महानुभावग्रथकारानी यासबधी बरीच कामगिरी केली आहे यवतमाळ येथील शारदाश्रमाचे उत्साही कार्यकर्ते श्री यशवत खुशाल देशपाडे याना मेघचदकृत

'यक्षदेववृद्धान्वय' या पोथीत मुकुदराजाच्या जयतपालासबधी बरीच नवीन माहिती मिळाली व ती त्यानी भारत-इतिहास-सशोधक मडळाच्या त्रैमासिकात (वर्ष १२ अक २) प्रसिद्ध केली सदर पोथी मेघचद्राने शके १६६१ मध्ये लिहिली असे शेवटी दिलेल्या लेखन-कालावरून दिसते मुकुदराजाचा उल्लिखित काल व सदर पोथीचा लेखनशक यामध्ये सुमारे साडेपाचशे वर्षाचे अतर असले तरी मेघ-चद्राने दिलेली माहिती नवीन असून बरीच उपयुक्त आहे ती ऐति-हासिक सत्याच्या दृष्टीने कितपत विश्वसनीय आहे, हे आता आपण पाहू त्यापूर्वी पोथीतील महत्वाचा भाग पुढे देतो

" राजोरा रोहणे झाडी मडळेसी
गावो पुण्यराशी जेतपाळ । ज्येष्ठ तात बधु नृपति मुकुदु
योगी ज्ञानसिधु ब्रह्मचारी । नेश्वर ससारू ज्ञाने जानुनीया
मग तो राघवा अनुसरे । गुरु आदिनाथु शिष्य हरिनाथु
तेणे रघुनाथु बोधिअेला । वैनगगेतीरी अब्रावती पुरी
भेटला मुरारी रामदेवा । रामासी वेदान्तु नागेद्रा सिद्धान्तु ।
गुरु नागनाथु आम्हासये । नरसिह बल्लाळ पुत्र जैतपाळ
आनुज अमळ महादेवो । धाकला अनुज महेश भुभुज
तयाचा आत्मजु सारगु नो । घेउनी पल्लवी राज्यभार घाली
सपती ओपीली बधुपुत्रा । आपण मुकुदापदी शरण जाला
सगत्याग केला जैतपाळे । कुबेराही पासी सपत्ती विशेष
पोटी नसे वश जैतपाळ
तव गुरुराये महाराष्ट्रीया वाणी । वेदान्तु कथोनी तोखविला
विवेकसिधू पै नाम सबोधीली । तोची लोकी आली आजवेरी "

वरील उताऱ्यात जैतपालाच्या हकीकती शिवाय मुकुद

राजाची गुरुपरपरा दिली आहे ती विवेकसिधूतील परपरेशी बरोबर जुळते फक्त एकच नवीन गोष्ट मेघचदाने दिली आहे मुकुदराजाचे गुरु रघुनाथ याचा नागेन्द्र या नावाचा दुसरा एक शिष्य होता या नागेन्द्राच्या परपरेनच श्रीचक्रधराचा शिष्य यक्षदेव हा असून यापासूनच महानुभावपथाच्या तेरा आम्नायापैकी एक यक्षदेव आम्नाय निघाला, असे श्री देशपाडे याचे मत आहे (सदर लेख) यावरून मुकुदराज हे चक्रधरापूर्वी होऊन गेले असावेत अथवा समकालीन तरी असले पाहिजेत असे आटते

मेघचदाने जैतपालासबधी दिलेली माहिती महाराष्ट्राच्या इतिहासात अपूर्व आहे जैतपालाच्या राजधानीचे ठिकाण राजोरा रोहणे हे साप्रत वऱ्हाडातील मोर्शी तालुक्यात राजूररोहीनखेड या नावाने प्रसिद्ध आहे जैतपालाचा धाकटा बधु महादेव व पुतण्या सारगु—ज्याला पुढे जैतपालाने दत्तक घेऊन आपले राज्य दिले—याचा महाराष्ट्राच्या इतिहासात कोठेच उल्लेख नसला तरी आध्रप्राताच्या इतिहासात या दोघा पितापुत्रासबधी माहिती उपलब्ध आहे वरगळचा आध्र राजा काकतीय गणपती देव (सन ११९९) याचा मनुमसिद्धो नावाचा एक माडलिकअसून तो नेल्लोर येथे राज्य करीत होता सुप्रसिद्ध तेलगू भारत-कार तिक्कणा हा याच माडलिकाचा मत्री होता तिक्कणाने आपल्या निर्वचनोत्तर रामायणात मनुमसिद्धीच्या पराक्रमवर्णन-प्रसगी 'महाराष्ट्रसामत सारगु' या नावाने एका महाराष्ट्रीय सस्थानिकाचा उल्लेख केला आहे याशिवाय 'नेल्लोरदानशासन' भाग ३ न ७६ या लेखात या महाराष्ट्रसामतासबधी बरीच हकीकत आली आहे त्यावरून चिलकुरी वीरभद्रराव या गृहस्थाने "आध्रुलचरित्रमु" या तेलगु ग्रथात या सामताचा थोडक्यात

इतिहास दिला आहे त्यामध्ये सारगाच्या बापाचे नाव महादेव नायक असून तो सन १२१० च्या सुमारास–महादेवाचे लेख सन १२१० ते १२४७ पर्यंत उपलब्ध आहेत – अद्दकी सीमेवर (गुतुर जिल्हा) राज्य करीत होता असे दिसते या महादेवास (१) सिगलदेव (२) सारगपाणी (३) गोपालदेव असे तीन पुत्र होते त्यापेकी दुसरा पुत्र सारगपाणि हाच यक्षदेव वृद्धान्वयातील जैतपालाचा दत्तक पुत्र असावा वडील बधु जैतपाल महाराष्ट्रात राज्य करीत असताना महादेवाने मुलुखगिरी करून तेलगणाचा काही भाग बळकावला असेल शिवकालीन इतिहासातहि असा प्रकार झालेला आहे शिवाजीचे महाराष्ट्रावर स्वामित्व असताना व्यकोजी तजावरासारख्या दूर प्रातावर आपला अधिकार चालवीत होताच विवेकसिधूतील शके १११० अथवा साधारण सवत्सरावरून शके १११२ हा काल महादेव नायकाच्या वर दिलेल्या कालापासून फार दूर नाही तेव्हा मेघचदाने यक्षदेव वृद्धान्वयात जैतपालासबधाने जी माहिती दिली आहे ती असत्य नसून तेलगू इतिहासावरून तिला सत्याचा आधार आहे हे वाचकास सहज कळून येईल

## मुकुदराजाच्या समाधि

मुकुदराजाच्या समाधि अनेक ठिकाणी आहेत त्यापैकी, निझाम सस्थानातील आबेजोगाई आणि मध्यप्रातातील बैतुलजवळ खेडले ही ठिकाणे विशेष प्रसिद्ध आहेत आबेजोगाई येथील समाधीसबधी चौकशीअती मला असे समजले की, ती शेदीडशे वर्षांहून जुनी नाही शिवाय मध्यप्रातातील समाधीच्या सत्यत्वाला, मुकुदराजाचे गुरु व आजेगुरु हरिनाथ याच्या समाधीच्या नजीकपणाचा जो आधार आहे तोहि आबेजोगाई येथे नाही तसेच जैतपालाचे

प्राचीन राजधानीचे ठिकाण राजूर रोहिनखेट हे आंबेजोगाईपेक्षा बैतुलच्या भागाला जवळचे असल्यामुळे मुकुंदराजाच्या समाधीचे हे दुसरे ठिकाण (खेडलेजवळ असोर) जास्त विश्वसनीय वाटते



# मुकुंदराज पुन्हा एकदा

प्रस्तुत लेख सह्याद्रि मासिकात प्रसिद्ध झाल्यावर याच विषयावर श्री वि अ कानोले, डॉ श गो तुळपुळे आणि श्री गो रा गोगटे यानी आपले विचार नियतकालिकातून प्रदर्शित केले त्यापैकी श्री कानोले आणि डॉ तुळपुळे याचे विचार मकुदराजाच्या कालनिर्णया-पेक्षा स्थळ निश्चितीवर केद्रित झालेले आहेत मुकुदराजाची समाधि विवेक सिधूतील मनोहर अबानगरी आणि वैनगगानदी यावरून मुकुदराज हे हैद्राबाद सस्थानातील आबेजोगाई या गावचे राहणारे होते, मध्यप्रातात बैतुलजवळ असलेल्या अभोर या गावाशी त्याचा सबध नव्हता असा त्याच्या मताचा निष्कर्ष दिसतो. परतु त्यानी यासबधी आपल्या मताना पोषक म्हणून जे आधार दिलेले आहेत ते पौराणिक आणि दतकथेचे आहेत योगेश्वरी महात्म्य' या डॉ तुळपुळचाच्या आधारभूत ग्रथाचे स्वरूप पौराणिक आहे असे स्वत. लेखकच सागतात तेव्हा हा आधार कितपत विश्वस-नीय मानावा हा प्रश्नच आहे विवेकसिधूतील 'शके अकरा-दाहोत्तरू' या ओवीवरून शकसवत्सराचा मेळ बसत नाही, ही गोष्ट जरी मान्य केली तरी पण ती ओवी प्रक्षिप्त म्हणता येईल काय? कारण हा आक्षेप इतरहि कित्येक प्राचीन ग्रथावर येईल अशा चुका नकला करणाऱ्याच्या हातून घडणे सभवनीय असते अथवा विशिष्टकालगणना पद्धतीमुळे अशा चुका होतात परतु डॉ तुळपुळे याना कालनिर्णयापेक्षा स्थलनिर्णयाचा प्रश्न जास्त

गुतागुतीचा वाटतो वैनगगा आणि अबानगरी बरोबर नृसिहाचा बल्लाळ आणि त्याचा कुमर जयतपाळ अशी त्रयी विवेकसिधूत आली आहे तेव्हा या सर्वांचा मेळ कसा बसावा ? योगेश्वरी महात्म्यात जैतपाल अथवा जयतपाल हा जैनराजा होता त्याने एक महायज्ञ आरभला आणि सिद्धीच्या मागे लागून साधूचा छळ केला तेव्हा मुकुदराजानी राजाला चमत्कार दाखवुन साधूना मुक्त केले आणि राजाकरिता विवेकसिधु हा ग्रथ रचिला- इत्यादि कथा दिली आहे

योगेश्वरी महात्म्यात आलेल्या वरील कथेत बरीच विसगति आहे जैतपाल हा जर धर्माने जेन होता तर तो होम किवा महा-यज्ञ कसा करील ? कारण वैदिक यज्ञयाग हे प्रकार जैनधर्माच्या विरुद्ध आहेत आबेजोगाई येथे कलचुरी घराण्यातील जैत्रपाल नावाचा एक माडलिक जेनराजा होता असे जोन्सबर्जेस याचे मत आहे ते खरे जरी धरले तरीपण शक सवत्सराच्या ओवीतील नाव जैत्रपाल नाही शारगधर असे आहे ती ओवी अशी आहे - 'शके अकरा दाहोत्तरू । साधारण सवत्सरू । राजा शारगधरू । राज्य-करी ' ही ओवी काही हस्तलिखित पोथ्यात आहे छापील पोथीत नाही परतु छापील प्रतीत जैत्रपालाला राजा या नावाने सबोधिले नाही तेव्हा शके ११२० यावर्षी शारगधर राजा राज्य करीत होता या शारगधराचा उल्लेख योगेश्वरी महात्म्यात नाही दुसरे असे की मनोहर अबानगरी ही मुकुदराजाचे गुरूचे गुरु हरिनाथ याचे राहण्याचेगाव होते विवेकसिधून या नाथपथी योग्याचे वर्णन आलेले आहे अशा प्रसिद्ध साधूची समाधि आबेजोगाईस का नाही ? तसेच त्याचा शिष्य म्हणजे मुकुदराजाचा गुरु रघुनाथ याचीहि समाधि तेथे नाही या समाधि मध्यप्रातातील अभोर या

गावाजवळ आहेत

आबेजोगाई हे गाव सिघणयादवाचा सेनापति खोलेश्वर याची जहागीर अथवा सम्थान होते असे लेखावरून दिसते खोलेश्वरामुळे या गावाला यादवकाली बरेच वैभव प्राप्त झाले होते अद्यापहि त्या गावात खोलेश्वराचा एक मठ दाखविण्यात येतो त्या मठात खोलेश्वराच्या प्रशस्तिपर असा एक शके ११६२ चा शिलालेख आहे यानतर बहुधा कृष्ण अथवा महादेवाच्या राजवटीत महानुभाव पथ सम्थापक चक्रधर स्वामी यानी एकदा आंब्याला भेट दिली होती असे लीळा चरित्रावरून स्पष्ट दिसते त्यावेळी या गावाला खोलनायकाचे आबे–जोगाईचे नाही– या नावाने प्रसिद्ध मिळाली होती चक्रधर स्वामी या लीळेत खोल-नायकाचा-अर्थात् आब्या बरोबर उल्लेख करतात, पण मुकुदराजा-चा करीत नाहीत मुकुदराजाचे या गावी वास्तव्य असते तर चक्रधरानी त्याचा उल्लेख अवश्य केला असता कारण योगेश्वरी महात्म्यात मुकुदराजानी जैत्रपालराजाला याच गावात चमत्कार दाखवून त्याच्या छळातून साधूची मुक्तता केली होती आणि ही गोष्ट फार जुनी नव्हती खोलेश्वरा पूर्वी सुमारे पन्नासवर्षे विवेक-सिधूची रचना झाली होती चक्रधर स्वामीनी लीळा चरित्रात साधु सत्पुरुषाचे वेळोवेळी उल्लेख करून त्याच्या अद्भुत चमत्काराचे वर्णन केले आहे नाथपथी योग्यासबधी तर असे उल्लेख फार आहेत गोरखनाथ, अदडीनाथ इत्यादि नाथपथी योग्याचा ते फार आदराने उल्लेख करतात अशा स्थितीत मुकुदराजानी जैत्र-पालराजा समोर केलेल्या अद्भुत चमत्काराची प्रसिद्धि प्रत्यक्ष आब्याला भेट दिल्यावर चक्रधराच्या स्मरणात राहिली नसावी हे सभवत नाही डॉ तुळपुळे यानी आपल्या लेखात गारगवर

राजाचा मुळीच उल्लेख केला नाही तसेच शारगधर आणि जैत्र-पाल याचा परस्पर सबध काय होता हेहि सागितले नाही या दृष्टीने मेघचदाने यक्षदेववृद्धान्वयात दिलेली माहिती महत्त्वाची असून मुकुदराजाच्या कालनिर्णयाला उपयुक्त आहे डॉ तुळ-पुळे याच्या लेखासबधी या प्रमाणे विचार केल्यावर आता श्री गोगटे याच्या लेखाकडे वळू श्री गोगटे याचा 'आद्यकवि कोण? मुकुदराज की ज्ञानेश्वर ?, हा लेख चित्रमयजगत् मासिकाच्या जून १९५० या अकात प्रसिद्ध झाला या लेखात श्री गोगटे यानी आद्य कवीचा मान मुकुदराजाला न देता ज्ञानेश्वराना दिला आहे आणि त्या करिता त्यानी इतर साधनाचा विचार न करिता ज्ञानेश्वराचा अमृतानुभव आणि मुकुदराजाचा विवेक सिधु या दोन ग्रथातील ओव्याची परस्पर तुलना करून साम्यस्थळे दाखविली आहेत पण गमत अशी की, मी वर ज्या ओव्या दिल्या आहेत नेमक्या त्याच ओव्या श्री गोगट्यानी तुलनेसाठी घेऊन त्याना पोषक म्हणून काही ओव्या दिल्या आहेत आणि ज्या साम्यस्थळाच्या आधारे मी मुकुदराजाला आदिकवि ठरवून ज्ञानेश्वराना नतरची जागा दिली आहे त्याच्या उलट गोगट्यानी त्याच साम्य स्थळाच्या आधारा वर ज्ञानेश्वराना आदिकवीचा मान देऊन मुकुदराजानी त्याच्या कल्पनाची उसणवारी केली असे सागितले आहे आणि ही उसणवारी सिद्धकरण्यासाठी त्या ओव्यातील कल्पना ज्ञानेश्वरी ठशाच्या आहेत असे त्याचे म्हणणे आहे परतु एकदर प्रकरणावरून विचार केल्यास श्री गोगट्याचे मतपटत नाही कारण एक तर दहापाच ओव्यावरून अमक्याच्या ठशाच्या त्यातील कल्पना आहेत-हे सागणे कठीण दुसरे असे की उसणवारी करण्यासाठी त्या ग्रथाला प्रथितयश यावे लागते आणि

त्या करिता काही कालावधि जावा लागतो परतु विवेक सिधूतील मुसलमानी शद्बाच्या अभावावरून श्री गोगटे मुकुदराजाला ज्ञानेश्वर समकालीन अथवा अदमासे पन्नास वर्षाचा कालावधी देतात

हे कसे सभवनीय आहे ? ज्ञानेश्वरानतर लवकरच महाराष्ट्रात मुसलमानाची राजवट सुरू झाली ह्या आरभीच्या कालात सबध महाराष्ट्र एका महान् सकटात सापडून ज्ञानेश्वराचे ग्रथच जेथे लुप्तप्राय झालेले होते, तेथे त्या ग्रथाचा अभ्यास करून उसणवारी करण्याला वाव कुठे होता ? परतु ह्या सुमारास मुकुदराजाच्या विवेकसिधूचीच प्रसिद्धि इतकी झाली होती की, गुरुचरित्रकार सरस्वती गगाधराने मुकुदराजाचे अनुकरण करून आपला ग्रथ रचिला हे मी वर दाखविलेच आहे आणखी दुसरे असे की, उसणवारी करण्याचाच मुकुदराजाचा विचार असता तर ज्ञानेश्वरी सारख्या लोकप्रिय अलौकिक ग्रथातील सुदर काव्यमय कल्पनाची उसणवारी करण्याला त्याना कोणती अडचण होती ? तसा प्रकार पुढे श्री एकनाथानी नाही का केला ? मुकुदराज विवेकसिधूत "शाकरोक्ति बरी । मी बोलिलो मराठी वैखरी" असे सागतात म्हणजे शकराचार्यांचे अद्वैत तत्वज्ञान विशद करणारा त्याच्याकाळी एकहि ग्रथ मराठीत नव्हता ते काम त्यानी पहिल्याने केले परतु ज्ञानेश्वरानी जर ते कार्य आधीच करून ठेवले होते तर पुन मुकुदराजाना उसणवारी करून त्याच स्वरूपाचा ग्रथ रचण्याची आवश्यकता काय होती ? यावरून मुकुन्दराज ज्ञानेश्वरा पूर्वी होऊन गेले याच मताला बळकटी येते सद्गुरु निवृत्तिनाथ यानी ज्ञानेश्वरीनतर विवेकसिधूसारखा स्वतत्र ग्रथ रचण्याची ज्ञानेश्वराना आज्ञा केली या आख्यायिकेत या दृष्टीने बरेच तथ्य असावे असे वाटते मुकुदराजाची गुरु परपरादेखील ज्ञानेश्वरा–

पूर्वी मुकुदराज होऊन गेले या मताला पोषकच ठरते, ज्या नाथ परपरेचा मुकुदराजानी आपल्या ग्रथात उल्लेख केला आहे ती ज्ञानेश्वर पूर्वकालीन वाटते कारण आदिनाथानतर मच्छीद्र गोरखनाथादि व्यक्ति मुकुदराजाच्या परपरेत नाहीत या व्यक्तीना प्रसिद्धि मिळण्यापूर्वी ज्या नाथपरपरा अस्तित्वात होत्या त्यापैकी एका परपरेतले मुकुदराज होते मच्छीद्र–गोरखनाथाना प्रसिद्धि मिळाल्यावर–आणि ही प्रसिद्धि ज्ञानेश्वराच्या योगाने फार झाली-इतर परपरा लुप्त झाल्यासारख्याच झाल्या ज्ञानेश्वरानतर इतर परपराचे नावहि ऐकू येत नाही तेव्हा या दृष्टीने मुकुद–राजाचा काल ज्ञानेश्वरानतर ठरविता येत नाही याखेरीज श्री गोगटयानी शक, शारगधर आणि जैत्रपाल याच्या सबधाने मुकुद राजाचा काल ठरविताना काहीच विचार केला नाही मुकुद–राजाबरोबर त्याच्या कालाचा विचार करणे आवश्यक आहे यावरून श्री गोगटयाचे मत सयुक्तिक वाटत नाही

——o——

## महानुभाव आणि लिंगायत पंथ

प्रभातिसपन्न कवीच्या अभिजात काव्यामुळे ज्याप्रमाणे त्याच्या आश्रयदात्याला सत्कीर्तीचा लाभ होतो, त्याचप्रमाणे कित्येक वेळा धार्मिक छळाच्या नावाखाली एखाद्या राजाची सकारण वा अकारण अपकीर्ति होते या अपकीर्तीला अर्थात् ज्या धर्माच्या अनुयायाना छळाचे चटके बसतात, त्याच्या लिखाणामुळे प्रथमत वाचा फुटते आणि त्या धर्मप्रसाराबरोबर तीहि पसरते आणि टिकून राहते

कलचुरी घराण्यातील कल्याणीचा राजा विज्जल व देवगिरीच्या यादव वशातील शेवटचा राजा रामदेव याना अनुक्रमे लिगायताच्या आणि महानुभावाच्या धार्मिक ग्रथात अशा प्रकारे बरीच प्रसिद्धि मिळाली आहे ★ लिगायत पथाचा सस्थापक बसव आणि राजा विज्जल याच्यामधील नाते सेव्यसेवकाचे असल्यामुळे, बसवाच्या धार्मिक आदोलनाला पुढें राजकीय बडाचे स्वरूप प्राप्त झाले आणि त्या बडाचे दुष्परिणाम दोघाना सारखेच भोगावे लागले त्यामुळे कदाचित् विज्जल आणि बसव ही जोडी इतिहासात प्रसिद्ध झाली असावी अशा प्रकारची प्रसिद्धि रामदेवाला अजून मिळाली नाही याचे कारण एक तर रामदेव आणि महानुभावपथप्रवर्तक चक्रधर याच्यामधील लढा वरच्याप्रमाणे

---

★ 'एन्शट इडिया'– एस के आयगार, पृ ७६८-६९, तसेच 'लीलाचरित्र आणि 'स्मृतिस्थळ' यातील रामदेवासबधाचा उल्लेख पाहा

राजकीय स्वरूपाचा नव्हता, दुसरे असे की, तत्कालीन आणि आणि तदनतरचे समग्र महानुभाव वाङमय अजून प्रकाशित झाले नाही पुढे कदाचित् अप्रकाशित ग्रथाना प्रकाशनाचा लाभ झाला तर रामदेव यादव या बाबतीत विज्जलाला हार जाणार नाही असे वाटते

वस्तुत समकालीन ताम्रपट आणि इतर कवीच्या ग्रथातील उल्लेख यावरून विज्जल आणि रामदेव हे दोघेहि परमतसहिष्णु आणि प्रजाहितदक्ष राजे होते असे दिसते विज्जल स्वत जैनधर्मानुयायी होता तरी पण त्याने आपल्या कारकीर्दीत जैनाप्रमाणेच वैष्णव आणि शैव याच्या मदिराना आणि उपासकाना इनाम जमिनी आणि इतर देणग्या दिल्या होत्या, असे शिमोगा जिल्ह्यातील बलगम्वे ताम्रपटावरून आढळून येते विज्जलाप्रमाणे रामदेव यादवाच्या अमदानीत देखील वैदिक ब्राह्मण आणि सस्कृत पडित याच्याप्रमाणे वारकरी साप्रदायाचे उपास्यदैवत श्रीविठ्ठल आणि मराठी कवि याचा योग्य परामर्श घेण्यात येत असे, असे चौऱ्याशी आणि इतर तत्कालीन लेखावरून समजते रामदेवाच्या न्यायप्रियतेमबधाने सतशिरोमणि ज्ञानेश्वरमहाराज यानी 'सकल कला निवासु, न्यायाते पोषी क्षितीशु ' असे गौरवपर काढलेले उद्गार तर प्रसिद्धच आहेत

परतु या दोघावर लिगायत आणि महानुभाव ग्रथकारानी आपल्या ग्रथात उलट आरोप केले आहेत कर्नाटकातील चालुक्याचे राज्य विज्जलाने अन्यायाने बळकाविले आणि आपल्या राज्यात नास्तिकपणाचा कळस केला, असे लिगायत ग्रथकार म्हणतात, महानुभावाच्या ग्रथातील वर्णनावरून तर रामदेवाने विज्जलावरहि ताण केली आहे त्याने राज्याच्या खऱ्या वारसाचे म्हणजे आमण-

देवाचे डोळे काढून गादी मिळविली असे लीलाचरित्रातील ७२५ व्या लीलेवरून स्पष्ट दिसते लीलाचरित्र आणि स्मृतिस्थळ यातील इतर उल्लेखावरून तर रामदेवाच्या कारकीर्दीत महानुभावाना बराच उपसर्ग झाला असावा असे आढळून येते तेव्हा लिगायताप्रमाणेच महानुभावाचे मतहि समकालीन राजासबधी बरेच प्रतिकूल होते असे म्हणण्यास हरकत नाही या बाबतीत ज्याप्रमाणे या दोन भिन्न पथाच्या अनुयायाच्या मतामध्ये साम्य आहे त्याचप्रमाणे त्याच्या प्रमुख आचार्यांच्या चरित्रात आचार-विचारात आणि तत्त्वज्ञानात एकप्रकारे विलक्षण साम्य आढळून येते प्रस्तुत स्थळी अशा प्रकारची साम्यस्थळे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे

## पचकृष्ण आणि पचाचार्य

महानुभाव आणि लिगायत हे दोन्ही उपासनाप्रधान पथ असले तरी त्याची उपास्यदैवते भिन्न आहेत परतु ज्या प्रमुख अवताराच्या कृपाप्रसादामुळे हे दोन भिन्न पथ उदयास आले, त्याच्या सख्येत महाभारत व भगवद्गीता याच्या अध्यायाच्या सख्येप्रमाणे एकवाक्यता आहे या सृष्टीमध्ये परमेश्वर युगायुगाच्या ठायी अवतार घेऊन भक्ताचा उद्धार करतो, अशी महानुभावाची समजूत असली, तरी पण आतापर्यत मुख्य पाचच अवताराना त्याच्या धर्मात मान्यता मिळाली आहे कृष्ण, दत्त, चक्रपाणी अथवा चागदेव राऊळ, गोविद प्रभु अथवा गुडम राऊळ आणि चक्रधर अथवा चागदेव राऊळ हेच ते पाच अवतार होत याना महानुभाव 'पचकृष्ण' या नावाने सबोधतात सिद्धान्तसूत्रासारखे वेदतुल्य धार्मिक ग्रथ आणि इतरहि महानुभाव वाङमय यामध्ये या पचकृष्णाना आरभी नमन केलेले असते तसेच त्याची

चरित्रेहि महानुभावग्रथकारानी गायिलेली उपलब्ध आहेत

महानुभावाप्रमाणेच लिगायत लोकात देखील ह्या पाच अवताराच्या कल्पनेला फार महत्व आहे हे पाच अवतार म्हणजे शिवाची सद्योजात, वामदेव इत्यादि पाच मुखे होत या पाच मुखानी निरनिराळ्या युगात निरनिराळी नावे धारण करून जीवाचा उद्धार केला अशी त्याची समजूत आहे या मुखाना ते आचार्य म्हणतात या आचार्यांनी कलियुगात रेवणसिद्ध, मरुळ-सिद्ध, एकोराम, पडिताराध्य आणि विश्वाराध्य अशी नावे धारण करून लिगायत धर्माची स्थापना केली लिगायताच्या दीक्षा-लग्नादि धार्मिक विधीत या पाच आचार्यांची पचकलशाच्या रूपाने स्थापना करण्यात येते आणि आरभी त्याची पूजा झाल्या-वर मग मुख्य विधीस आरभ होतो, इतके महत्व या पाच आचार्यांना या पथात आहे

### चक्रपाणी आणि अल्लमप्रभु

महानुभावाचे तिसरे अवतार म्हणजे चक्रपाणी अथवा चाग-देव राऊळ आणि लिगायत पथातील शून्य सिहासनाचे पहिले आचार्य अर्थात् अल्लमप्रभु, या दोघाच्या आयुष्यातील चमत्का-राची वजा-बाकी केल्यावर ज्या प्रमुख घटना शिल्लक राहतात त्यामध्ये परस्पर साम्य इतके आहे की, त्याचे मूळ एकच असावे असे वाटते उदाहरणार्थ, दोघाच्या आई-बापाना पुत्रसतान नस-ल्यामुळे नवससायास करावे लागतात अल्लमप्रभु शेवटपर्यंत नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळतो चक्रपाणीच्या वडिलानी त्याचे लग्न जरी केले होते तरी पण त्याने आपली ब्रह्मचर्याची प्रवृत्ति शेवटपर्यंत सोडली नाही तसा प्रसग येताच मातापुरास गमन केले पार्वतीने अल्लमाच्या ब्रह्मचर्याची परीक्षा पाहण्याकरिता शाबरी मायेस

निर्माण केले त्या मायेने बिलवळी देशातील राजकन्येचे रूप घेऊन मधुकेश्वराच्या देवळात विरक्त अल्लमप्रभु बसला असताना समागमाची याचना केली राजकन्या मायेची ही विनती अर्थात् अल्लमाने अमान्य केली तेव्हा राजकन्येने जास्तच हट्टास पेटून अल्लमाला स्पर्श करण्याचा प्रयत्न केला, त्यावेळी अल्लम गुप्त झाला अशासारखाच प्रकार चक्रपाणी–चरित्रातहि आहे चक्रपाणी द्वारावतीला गुफेत बसले असताना काऊरळीची प्रसिद्ध योगिनी वेश्या कामाख्या गुफेच्या दारी येते आणि 'मजला रति द्यावी जी' असा त्याला आग्रह करते तिची ही विनती अर्थात् चक्रपाणी अमान्य करतात तरी ती आपला आग्रह सोडून देत नाही हा आग्रह सात अहोरात्र चालू असतो. शेवटी त्याला स्पर्श करण्यासाठी ती आत प्रवेश करण्याचा प्रयत्न करते, त्या वेळी चक्रपाणी आपला देह विसर्जन करतात अल्लमप्रभूने आपले अवतारकार्य जरी कर्नाटकात केलें तरी पण त्याची समाधि महाराष्ट्रात हैद्राबाद संस्थानातील भूम या गावी आहे ही समाधि लिंगायतपद्धतीची नाही महानुभावाच्या पूजास्थानासारखी ओट्याच्या आकाराची आहे आणि त्या समाधीचे पुजारी लिंगायत असून ते दत्ताची उपासना करतात, ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे तसेच एकनाथमहाराजाचे गुरु जनार्दनस्वामी याना अल्लमप्रभूचा उपदेश होता असे कै भावे यानी महाराष्ट्रसारस्वतात एक विधान केले आहे, ते विचार करण्यासारखे आहे

## चक्रधर आणि बसव

चक्रधर आणि बसव हे दोघे जातीने ब्राह्मण असून यानी वैदिक कर्मकांड आणि चातुर्वर्ण्य याचे विरोधी पंथ स्थापन केले दोघानाहि जातिभेदामुळे निर्माण झालेली विषमता मान्य नव्हती

स्त्रियाचा दर्जा पुरुषाच्या बरोबरीचा असून पुरुषाप्रमाणेंच त्याना-हि मोक्षाधिकार आहे अशी दोघाची समान विचारसरणी होती सस्कृत विद्येचे महत्त्व दोघानाहि मान्य नव्हते ते आपल्या पथाचा प्रचार देशी भाषेतच करीत, इतकेच नव्हेतर आपल्या अनुयायानी ग्रथरचना देशी भाषेतच करावी असा त्याचा दडक असे बसव हा विज्जलाचा प्रधान असून राजाशी त्याचे शालकाचे नाते होते चक्रधरहि पूर्वायुष्यात भडोच येथील प्रधानाचा पुत्र होता इतकेच नव्हेतर काही दिवस त्याला राजैश्वर्यहि उपभोगावयास मिळाले प्रचलित धर्मसमजुतीविरुद्ध त्यानी आपल्या मताचा प्रचार आणि प्रसार करण्याचा प्रयत्न केल्यामुळे दोघानाहि शेवटी राजक्षोभाला बळी पडावे लागले

## आचारविचार

हे दोन्ही पथ सामाजिक विषमतेच्या विरुद्ध आहेत हे वर सागितलेच आहे विशेषत स्त्रीशूद्रासबधी उभय पथसस्थापकाचे धोरण उदार होते लिगायत पथात स्त्रियाना पुरुषाप्रमाणेच पथाची दीक्षा देण्यात येते महानुभाव हे सन्यासमार्गी असल्यामुळे स्त्रियाना पुरुषाप्रमाणेच सन्यास घेण्याचा अधिकार आहे परतु दोन्ही पथात स्त्रिया मासिक विटाळ पाळीत नाहीत तात्त्विक दृष्ट्या हे दोन्ही पथ मूर्तिपूजेच्या विरुद्ध आहेत ★ परतु आचा-रात मूर्तिपूजेचा अन्तर्भाव त्यानी केला आहे लिगायत लोक ज्याप्रमाणे शिवालयात जाऊन शिवलिगाची पूजा–अर्चा करतात त्याप्रमाणे महानुभावहि संबधी पाषाणाच्या मूर्ति बसवून पूजा करतात या दोन्ही पथात अग्नीची वैदिक उपासना अमान्य अस-

★ए हॅण्डबुक ऑफ वीरशैविझम –प्रोफेसर नदिमठ पृ ५३

त्यामुळे त्यांचे प्रेतसंस्कार अग्निविरहित होतात त्यामुळेच प्रेते पुरण्याची चाल पडली असावी या दोन्ही पंथांनी शिखासूत्राचा त्याग केला असून इतर धार्मिक संस्कारांनाहि सोडचिट्ठी दिली आहे लिंगायतात लग्नपद्धति आहे, पण ती वैदिक नाही त्यांच्यात बरेच पोटभेद आहेत त्यांपैकी निराभारी, वीरशैव अथवा लिंगायत महानुभावाप्रमाणेच लग्न न करता संन्यस्त वृत्तीने राहतात महानुभाव हा संन्यासप्रधान पंथ असल्यामुळे लग्नसंस्काराचे त्यांना कारण नाही

### तत्त्वज्ञान

दक्षिणेत दहाव्या शतकानंतर जे पंथ उदयास आले त्यांच्या प्रवर्तकांनी तत्त्वज्ञानावर विशेष भर न देता भक्तिमार्गाचा प्रामुख्याने अवलंब केला रामानुज, मध्वादि थोर आचार्य तसेच लिंगायतादि अवैदिक पंथप्रवर्तक यांनी आपापल्या सांप्रदायाची उभारणी भक्तीवरच केलेली दिसून येते परंतु उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रादि वेदान्तग्रंथांना धार्मिक प्रामाण्य आणि लोकप्रियता प्राचीनकालापासून लाभल्यामुळे तत्त्वज्ञानाच्या साहाय्याखेरीज निर्भेळ भक्तीवर आपल्या सांप्रदायाची उभारणी जर केली तर त्यांना लोकांच्या आदरास मुकावे लागेल, ह्या जाणिवेमुळे हे पंथ प्रवर्तक तत्त्वचर्चेच्या खटाटोपात पडले असावेत असे वाटते रामानुजमध्वादि आचार्य वैदिक धर्माचे विशेषत ब्राह्मण्याचे अभिमानी असल्यामुळे तसेच ते संस्कृत विद्येत निष्णात पंडित असल्यामुळे आपल्या भक्तीला जुळेल अशी मतप्रणालि त्यांना प्रस्थानत्रयीतून काढता आली आणि त्याकरिता त्यांनी विरोधि वचनांची आपल्याला अनुकूल अशी फिरवाफिरव केली परंतु चक्रधर आणि बसव यांची भूमिका आणि योग्यता आचार्यांच्या मानाने जरा भिन्न

होती हे दोघे रामानुजादि आचार्याप्रमाणे जसे थोर सस्कृत पडित नव्हते, तसेच ब्राह्मण्याचे अभिमानीहि नव्हते म्हणूनच त्याच्या वचनात शास्त्रीय पद्धतीला अनुसरून सुसगत माडलेली अशी विशिष्ट मतप्रणालि आढळत नाही लिगायत पथाच्या उदयकाली म्हणजे १२ व्या शतकात जे वचनग्रथ निर्माण झाले त्यावरून या पथाचा कल अद्वैताकडे होता असे दिसते परतु पुढे पुढे श्रीकठनीलकठासारखे जे थोर पडित या पथात उदयास आले, त्यानी अद्वैताऐवजी विशिष्टाद्वैताचा पुरस्कार केला असे डॉ नदिमठ याचे मत आहे ★ डॉ भाडारकरहि लिगायत पथ विशिष्टाद्वैताचा पुरस्कर्ता आहे असे म्हणतात $ परतु महानुभावाच्या तत्त्वज्ञानासबधी थोडा मतभेद दिसून येतो श्री. वा ना देशपाडे हे महानुभावपथप्रवर्तक चक्रधरानी "सिद्धातसूत्र पाठामध्ये मध्वाचार्याच्या द्वैतवादाचाच अनुवाद केलेला आहे" असे म्हणतात, आणि त्यासाठी "जीवेस्वरास्वामीभृत्यसबध हा अनादीचा" (विचार १२४) या सूत्राचा आधार देतात मरतु हे मत बरोबर आहे असे वाटत नाही सिद्धातसूत्रपाठात मध्वाचार्याना मान्य नसलेली माया ठसक्यात वावरते तसेच "परमेश्वरू नीर्वेव निराकारु असे", "ज्ञानि या ब्रम्हीभूत करीति", "ज्ञानियासि मोक्ष देति", "ज्ञानिया ब्रम्ही मिसळे, बुडीदे, भक्त भेदे अनुभवो की अभेदे अनुभवी ऐसे विकल्प तेथ करू नएति" इत्यादि वचने द्वैतमताच्या उघड उघड विरुद्ध आहेत त्याची सगति कशी लावावयाची ? तसेच "ब्रह्म माया ईश्वरू ऐसा त्रिअशु परमेश्वरु

★ ए हॅण्डबुक ऑफ् वीरशैविझम् पृ ९५

$ वैष्णविझम् अॅण्ड शैविझम्.

एकु अति" ही त्र्यंश परमेश्वराची कल्पना मध्वाचार्यांपेक्षा रामानुजमताला जवळची आहे त्या मतात चित्, अचित् आणि ईश्वर असे परब्रह्माचे तीन भाग अथवा अंश मानले आहेत यावरून हा पंथ मध्वाचार्यांच्या द्वैतमताचा पुरस्कर्ता आहे, हे मत टिकत नाही पण या सर्वांपेक्षा या ग्रंथात एक विशेष गोष्ट सांगितली आहे, ती म्हणजे आद्य मलाची कल्पना ही कल्पना रामानुजमध्वांना ममत नाही या कल्पनेचा पुरस्कार शैवसिद्धान्तात प्रामुख्याने केलेला आढळून येतो लिंगायत तत्त्वज्ञानातहि ती वावरते आणि महानुभावात तर तिला बरेच महत्वाचे स्थान मिळाले आहे यावरून तत्त्वज्ञानाच्या बाबतीत उपास्य दैवते भिन्न असूनहि हे दोन पंथ जवळ जवळ येतात

असो, महानुभाव आणि लिंगायत पंथाच्या आचारविचारादि बाबतीत वर सांगितल्याप्रमाणे परस्पर साम्य आणि एकवाक्यता आढळून आली, तरी प्राचीन काली त्यांचा परस्परसंबंध अथवा दळण वळण चालू असल्याचे ग्रंथावरून तरी दिसत नाही चक्रधराला लिंगायत पंथासंबंधी माहिती असावी असे त्याच्या लीलाचरित्रावरील उद्गारावरून दिसते वरंगल प्रदेशी त्याचे वास्तव्य असताना सदर्थु माल्हु आणि तेली यांच्या आदरातिथ्याचा त्याने स्वीकार केला होता त्या प्रसंगांना अनुसरून त्याने काढलेले "एया लिंगा माझे घरी सोमनाथु आला मल्लीनाथु आला, बाई, तो सांप्रदायकु पूजा जाणे", इत्यादि उद्गार लक्षात ठेवण्यासारखे आहेत यावरून त्याला या शैवपंथाची माहिती असावी असे वाटते

महानुभाव आणि लिंगायत मतानुयायांनी धार्मिक आणि सामाजिक दृष्टया केलेली कामगिरी मोलाची तर आहेच, पण

त्याखेरीज त्यानी मोठ्या प्रेमाने आणि अभिमानाने मराठी आणि कानडीसारख्या देशी भाषाची केलेली सेवा अपूर्व आहे महदबा आणि महादेवी अक्का या दोन थोर कवियित्री मराठी आणि कानडी वाङमयात आपल्या तेजाने चमकतातच, पण त्याखेरीज भास्करभट्ट, केसोबास नरेंद्र पडित यासारखे महानुभाव कवि आणि राघवाक, हरिहर, भीमकवि, चामरस सारखे लिगायत ग्रथकार मराठी आणि कानडी वाङमयात ललामभूत झाले आहेत त्यानी आपल्या अभिजात वाङमयकृतीनी रसिकावर थोर उपकार केले आहेत त्या उपकाराची फेड त्याच्या ग्रथाच्या अभ्यासानेच होणार आहे



भारत-इतिहास-सशोधक-मडळ पुणे यासस्थेच्या वार्षिक सम्मेलन प्रसगी वाचलेला निबध

# द्राविड सीमांवरील मराठी

डॉ. ग्रियर्सन यानी आपल्या *Linguistic Survey of India* या ग्रथाच्या सातव्या विभागात मराठीच्या प्रातिक बोलीचे विवेचन केले आहे आणि त्याकरिता कोकणी, वऱ्हाडी, नागपुरी, हळबी इत्यादि पोटभाषाचे ठिकठिकाणी नमुने देऊन त्या त्या बोलीचे स्वरूप विशद करण्याचा त्यानी प्रयत्न केला आहे या प्रातिक भेदापैकी, वऱ्हाडीच्या विवेचनात हैद्राबाद सस्थानातील मराठीचा नाममात्र उल्लेख करण्यात आला आहे यावरून कदाचित् ह्या सस्थानातील मराठीचे नमुने त्याना मिळाले नसतील अथवा प्रातिक भेदाच्या दृष्टीने मराठवाडचातील मराठी वऱ्हाडी पासून भिन्न नसावी अशी कदाचित् त्याची समजूत झाली असेल भौगोलिक दृष्टचा मराठवाडचातील औरगाबाद, परभणी, नादेड या जिल्ह्यातील काही तालुक्याच्या सीमा वऱ्हाड प्राताच्या सीमेशी जरी एकरूप झाल्या आहेत तरीपण, त्यावरून या सस्थानातील मराठीच्या विस्तृत कार्यक्षेत्राच्या मानाने ही अभिन्नत्वाची समजूत चुकीची ठरण्याचा बराच सभव आहे उदा मी जातो असा पुल्लिगी प्रयोग स्त्रियाच्या तोडी वऱ्हाडी भाषेत सहज येतो हा प्रकार मराठवाडचातील मराठीत सहसा आढळत नाही नसेच ळ बद्दल य उदा, डोळा जवळ, माळी या बद्दल डोया, जवय, मायी हा वऱ्हाडीचा विशेष इकडे आढळत नाही

पण या खेरीज या संस्थानातील मराठी भाषेचे दुसरे एक वैशिष्टय लक्षात ठेवण्यासारखे आहे येथील मराठवाडयाच्या दक्षिण आणि पूर्वेकडील सरहद्दीना अनुक्रमे कानडी आणि तेलगी या द्राविडी भाषाच्या सीमा भिडलेल्या दृष्टीस पडतात यांप्रमाणे या तीन भाषाचा त्रिवेणी संगम याच संस्थानात आढळून येतो भाषादृष्टया हे या संस्थानाचे वैशिष्टय आहे, असे म्हणता येईल द्राविडी भाषाच्या शेजारधर्माचा परिणाम मराठवाडयातील मराठीवर होणे शक्य आहे, आणि प्राचीन मराठी शिलालेख आणि ग्रथ यावरून तसा तो झालेला आहे असे वाटते तेराव्या शतकातील वारकरी सांप्रदायाचे आद्यप्रवर्तक ज्ञानेश्वर महाराज याचा लोकोत्तर काव्यारावो घ्या अथवा कविश्वराचार्य भास्कर-भट्ट बोरीकर, नरेंद्र पडित, केशवराव सूरी इ महानुभाव थोर कवीचे काव्यग्रथ घ्या, या सर्व वाङमयात कानडी तेलगु शब्दाचे बरेच वैपुल्य आढळून येते उदा मातु, हुडे, हरळु, बोने गुडे, उळिग इ पुष्कळ शब्द विशेष बदल न होता मूळ स्वरूपातच तत्कालीन ग्रथात सापडतात. इतकेच नव्हे तर, "पन्नासिले हे गगनाचे हुडे" यातील पन्नासिले हे पन्नु रचना करणे या तेलगु धातूवरून बनविलेले भूतकाळचे रूप अशासारखे प्रकारहि कोठे कोठे दिसतात

मराठीवाङमयाच्या आरभकालापासून एकनाथ दासो-पताच्या कालापर्यंत बहुतेक सर्व कवीची जन्मभूमि अथवा कर्मभूमि हा मराठवाडाच असल्यामुळे, इतकेच नव्हे तर, कै भावे याचे मत मान्य केल्यास, या मराठवाडयातच मराठी भाषेचा उगम आणि विकास झाला असल्यामुळे तत्कालीन मराठी भाषा आणि वाङमय यामध्ये शेजारी वावरणाऱ्या कानडी तेलगु शब्दाचे वैपुल्य

आढळून येते शेजारधर्माचा परिणाम हे कारण काही अंशी जरी बरोबर असले, तरीपण, याहिपेक्षा दुसरे एक बलवत्तर कारण होते असे मला वाटते ते कारण म्हणजे, यादवाच्या पूर्वी महा-राष्ट्रावर राष्ट्रकूट, उत्तर चालुक्य आणि काही अंशी काकतीय याची सत्ता हे होय देवगिरीच्या यादवाच्या अमदानीत विशेषत 'यदुवंश विलासु सकलकला निवासु न्यायाते पोषी क्षितीशु' अशा रामचद्र यादवाच्या वैभवसपन्न कारकीर्दीत ज्याप्रमाणे मराठी भाषा आणि वाङमय याना राजाश्रय मिळून मराठी साहित्याची भरभराट झाली त्याचप्रमाणे मालखेडच्या राष्ट्रकूटानी, तसेच कल्याणीच्या चालुक्यानी कानडी भाषा आणि साहित्य याचा मोठ्या अभिमानाने पुरस्कार केला कानडी साहित्यातील कवि-राजमार्ग हा आदि ग्रथ राष्ट्रकूट वशातील नृपतुग राजाने रचल्या-बद्दल प्रसिद्धि आहे यादवाच्या सत्तेचा शेवट झाल्यावर पुढे मुसलमानी अमदानीत ज्याप्रमाणे फारशी अरबी भाषाचा परि-णाम मराठीवर झाला अथवा अलिकडील इग्रजाच्या राज्यात मराठी भाषेवर इतकेच नव्हे तर, मराठी साहित्यावरहि इग्रजी विद्येचा अभूतपूर्व परिणाम झालेला दिसून येतो, त्याचप्रमाणे राष्ट्रकूट चालुक्याच्या काळात कानडी राजभाषेचा मराठीवर परिणाम झाला असावा या कारणामुळेच मला वाटते, मराठी भाषेच्या आणि साहित्याच्या उगमकाली कानडी तेलगु शब्दाचे प्राचुर्य तत्कालीन मराठीत दिसून येते परतु पुढील भिन्न भिन्न राजवटीत या द्राविडी शब्दाचा लोप होऊन त्या त्या राजभाषेचे शब्द मराठीत घुसले असावेत, असे मराठी भाषेच्या इतिहासा–वरून आढळून येते राष्ट्रकूट चालुक्य आणि काकतीय याच्या उत्कर्षाबरोबर कानडी तेलगी भाषानी आपले कार्यक्षेत्र वाढवून

मराठीची पिछेहाट केली त्याचप्रमाणे पण, त्याच्या उलट शिव–छत्रपतीच्या राज्यविस्ताराबरोबर आस्ते आस्ते मराठीने शेजारच्या कानडी आणि तेलगु प्रातावर आक्रमण करून त्या भाषाना मागे हटविले असावे असे गुल्बर्गा, बिदर, निजामाबाद, नादेड आणि आदिलाबाद या जिल्ह्यातील मराठी, कानडी आणि तेलगी याच्या सघर्षावरून दिसून येते तत्कालीन मराठीच्या क्षेत्रविस्ताराचा थोडा पुरावा श्री समर्थांनी स्थापन केलेल्या निजामाबाद आणि एक्केहळी येथील मठावरून मिळण्यासारखा आहे आजहि ही दोन्ही गावे मराठीच्या सीमा प्रातावर आहेत उपरिनिर्दिष्ट जिल्ह्यातील पश्चिमोत्तर भाग मराठीने व्यापला आहे याच्या उलट दक्षिण आणि पूर्व भागात अनुक्रमे कानडी आणि तेलगु भाषाचे व्यवहारक्षेत्र आहे परतु याच्या मधला जो टापू आहे, तेथील मराठीवर कानडी तेलगूचा अथवा याच्या उलट कानडी तेलगूवर मराठीचा कसा परिणाम झाला आहे, ही गोष्ट भाषा–शास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाची असून अभ्यास करण्यासारखी आहे प्रस्तुत निबधात मराठीवर या द्राविडी भाषाचा कसा परिणाम झाला आहे, हेच मला सागावयाचे असल्यामुळे इतर गोष्टीचा मी विचार केला नाही प्राचीन अवशेषाच्या उपलब्धीसाठीं उत्खनन चालू असताना एकाखाली एक आढळणाऱ्या थरावरून प्राचीन, प्राचीनतर, प्राचीनतम अशा युगाची अनुमान पद्धति पुराणवस्तु सशोधन शास्त्रात आढळून येते असाच काहीसा प्रकार भाषेसबधी होत असावा, असे नादेड जिल्ह्यातील बासर या गोदावरीच्या काठी वसलेल्या गावात मला आढळून आले

आज या गावात राहणाऱ्या ब्राह्मणाची मातृभाषा मराठी आहे पण त्याना तेलगु भाषेतहि चागल्या रीतीने व्यवहार करता

येतो याच्या उलट शेतकरी मजुराची भाषा तेलगी आहे परतु मराठी भाषा त्याना समजते इनकेच नव्हे तर त्या भाषेत ते आपले विचार प्रदर्शित करू शकतात याप्रमाणे या एकाच गावात दोन भाषा वापरताना दिसतात पण विशेष आश्चर्याची गोष्ट ही की, दहाव्या, अकराव्या शतकात या गावातील रहिवाश्याची भाषा कानडी असावी, असे तेथील पापहरेश्वराच्या पडक्या देवळातील कानडी शिलालेखावरून वाटते आपल्या माहितीसाठी त्या शिला-लेखापैकी एका शिलालेखाचा थोडा भाग येथे देतो या शिला-लेखाचे अद्याप वाचन झाले नाही यावरून तो प्रकाशित झाला नाही हे उघडच आहे शिलालेख नबर पाच –

स्वस्ति श्री वैसापुरद महाराज सेट्टी पापविनाशदेवर कम्पडि × × गेय मूळ दानार इस्थान अग्मुगळ ना × कुस

वैसापुर येथील महाराज सेट्टी या नावाच्या गृहस्थाने पाप-विनाश देवळासाठी काही द्रव्य दिले असावे, असा या शिला-लेखाचा आशय दिसतो बासर याचे प्राचीन नाव वैसापुर होते ही गोष्टहि या शिलालेखावरून उघड होते शिलालेखाची लिपी आणि भाषा यावरून हा शिलालेख दहाव्या अकराव्या शतका-तील असावा असे वाटते आज मराठी आणि तेलगी या भाषा-च्या सीमा प्रातावर वसलेल्या गावापैकी बासर हे क्षेत्र आहे या गावाच्या आसपास कोठेहि कानडीचा सपर्क नाही असे असताना दहाव्या अकराव्या शतकात हे स्थळ कानडीने व्यापलेले होते, हे पाहून आश्चर्य वाटते मला असे वाटते की, परभणी ताम्रपटात (हा ताम्रपट भा इ स मडळाने प्रकाशित केला आहे) ज्या अरिकेसरीचा उल्लेख आला आहे त्याची राजधानी बोधन होती हा राजा कानडी भाषेचा आणि वाङमयाचा अभिमानी असल्या-

मुळें तत्कालीन कानडीचे वर्चस्व असावे हे बोधन बासरपासून जवळच निजामाबाद जिल्ह्यात आहे यावरून दहाव्या अकराव्या शतकात या भागातील भाषा कानडी, पुढे काकतीयाच्या वेळी तेलगी आणि पुढे मराठ्याच्या अमदानीत मराठी असा या भाषाच्या कार्यक्षेत्राचा थोडक्यात इतिहास देता येईल नादेड निजामाबाद, आदिलाबाद या जिल्ह्यातील बऱ्याच मोठया भागावर मराठीचे आक्रमण झालेले दिसते आणि त्या भाषेवर तत्पूर्वीच्या भाषेचा परिणाम झालेला जसा दिसतो तसाच प्रकार गुलबर्गा बिदर जिल्ह्यासील मराठी भाषेसबधी झाला आहे पण तो परिणाम कानडीचा आहे माझ्या या मुद्याच्या समर्थनार्थ त्या भागातील मराठी बोलीचे दोन नमुने आपणापुढे सादर करतो एका उन्हाळयाच्या सुट्टीत काही कामानिमित्त बिदर जिल्ह्यातील कोहीर या गावो जाण्याचा मला प्रसग आला त्या गावातील शेतकऱ्याची भाषा आज मराठी आहे परतु त्या मराठीवर कानडीचा पदोपदी परिणाम झालेला दिसून येतो एका शेतकऱ्याच्या बायकोच्या मुखातून पुढील गोष्ट जशी आणि ज्या शब्दात मला ऐकावयाला मिळाली त्याच शब्दात मी येथे देतो –

'दोघ नवरा बायको एक पोरगी व्हती त्याच शेत पिकत व्हत कोपी घातले अरोळा घानले तिथे जोशी आला त्या जोशाला नवरा इचारला आमच शेतच पिकन नाही कुरडु पिकत जोशी म्हटला ते कुरडुच कापून त्याची बनीम घाला त्याची बनीम घालून खळ करून त्याचच गूड मोडा त्याचीच रास करून पावशेराच निवद करून ढवारा करा त्यान बायकोला सागितला की, पावशेराच निवद करून एकलीच आण बायको घरी येऊन निवद केली पोरीला म्हटली तुझा बाप निवद घेऊन

ये म्हटल्यात हे निवद शेताला पोहचता करून येते इ

या लहान उताऱ्यात दोन कानडी शब्द आहेत एक अटोळा आणि दुसरा बनीम या पैकी अटोळा म्हणजे शेतात पाखरे हाकण्याकरिता तयार केलेली उच जागा हा शद्ब कानडी अट्टल या शद्बाचे अपभ्रष्ट रूप दिसते मूळ कानडी शद्बाचा तोच अर्थ आहे त्याचप्रमाणे बनीम म्हणजे गजी--रास याचे कानडी मूळ रूप बणवे असे आहे अर्थहि तोच आहे या उताऱ्यात कानडी ठशाचे दोन शद्ब जरी आढळले तरी एकदर उताऱ्यातील पुष्कळशा वाक्याची रचना कानडी वळणाची आहे त्यामुळे लिगभेद आणि प्रयोग या सबधी बराच घोटाळा झालेला दिसतो उदाहरणार्थ -

त्या जोगाला नवरा इचारला, जोगो म्हटला त्यान बायकोला सागितला वायको घरी येऊन निवद केली इ वाक्ये कानडी वळणाची उघड उघड दिसतात कानडी भाषेत मराठीप्रमाणे कर्मणि प्रयोग होत नाही काहीसा इग्रजी भाषेप्रमाणे होतो मराठी कर्मणि प्रयोगात तृतीयान्त कर्ता प्रथमान्त कर्म आणि क्रियापद भूतकाळी कर्माच्या लिगवचनाप्रमाणे फिरते अथवा भावे प्रयोगात निरतर तृतीयपुरुषी नपुसकलिगी एकवचनी असते असा प्रयोग कानडीत होत नाही कर्त्याच्या लिगवचनाप्रमाणे क्रियापदाचे लिगवचन फिरते वस्तुत हा एक प्रकारे सकर्मक किवा अकर्मक कर्तरि प्रयोग आहे कर्मणि मुळीच नाही उदाहरणार्थ, त्यान बायकोला सागितला याचे कानडीत आवनू हेडतिगे हेळीदनु अशी रचना होईल यात आवनू म्हणज तो, हेडीतेग म्हणजे बायकोला, हेळीदनु म्हणजे सागितला यात अवनु या सर्वनामाचे जे लिग वचन आहे तेच हेळिदनु या क्रियापदाचे आहे मराठी वाक्यातील कर्त्याची तृतीया विभक्ति आहे हा प्रकार मराठी कर्मणिप्रमाणे,

पण क्रियापद मात्र सांगितले याच्या ऐवजी सांगितला असे कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणे बदललेले आहे या वाक्यावर मराठी प्रयोगाची जरी थोडी छाया पडलेली दिसत असली तरी " त्या जोशाला नवरा इचारला, बायको घरी येऊन निवद केली " इत्यादि वाक्यावर तर ती देखील नाही शुद्ध कानडी छापाची ही वाक्यरचना दिसते तसेच त्याने काम केले या ऐवजी तो काम केला, आवनु केलसा माडीदनु असा प्रयोग होतो

प्रयोगाप्रमाणे लिंगवचनाच्या बाबतीतहि कानडीचा या भाषेवर परिणाम झालेला दिसून येतो उदा पावशेराच निवद करून ढवारा करा या वाक्यातील निवद हा शब्द नपुंसकलिंगी दिसतो कानडी तेलगी इ द्राविडी भाषात इंग्रजीप्रमाणे अप्राणिवाचक नाम नपुंसकलिंगी असते या लिंगाच्या घोटाळ्यासंबंधी आणखी एक छोटासा उतारा येथे देतो दुसऱ्या एका गावी अशाच एका बाईने चिमणीची गोष्ट सांगितली त्या गोष्टीतील पुढील वाक्ये लिंगासंबंधीच्या घोटाळ्याची निदर्शक आहेत

कावळा व चिमणी होते पाऊस पडू लागल. कावळ्याच घर वाहून गेल चिमणीच्या घरला कावळा आल इ यातील पाऊस आणि कावळा यांचा नपुंसकलिंगी नामाप्रमाणे उपयोग करण्यात आला आहे यावरून कानडी भाषेचा या मराठीवर किती परिणाम झाला आहे हे सहज दिसून येईल

येथे एका गोष्टीसंबंधी उल्लेख करावासा वाटतो नागपुरकडे हिंदी मराठीच्या सीमाप्रांतावरील हळबी, रायपुरी इत्यादि बोलीत हिंदी मराठी शब्दांचे मिश्रण दिसते उदा 'मी देखलो नाही' असा प्रकार इकडील मराठीत नाही भाषा शुद्ध मराठी असणार मात्र वर दर्शविल्याप्रमाणे कानडीची त्यावर छाप

असावयाची

कानडी मराठीच्या सरहद्दीवर ज्याप्रमाणे मराठी बोलीचा नमुना पहावयास मिळतो तशाच प्रकारचा नमुना निजामाबाद, बासर, निर्मल या भागात मिळतो म्हणजे या भागातील मराठीवर अशाच प्रकारे तेलगी भाषेची छाया पडून शद्बाचे उच्चार, विशिष्ट प्रकारचे हेल आणि वाक्यरचना यामध्ये तेलगीचे वैशिष्टच दिसून येते

ब्राह्मण वर्गाच्या भाषेत तेलगीपेक्षा मराठीचे वळण प्रामुख्याने आढळत असल्यामुळे वरिष्ठ वर्गाची भाषा तितकी बिघडलेली दिसत नाही या सबधी अशिक्षित वर्गाची भाषा पहाण्यासारखी असते माझ्या मते भाषाशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला ह्याच भाषेचा जास्त उपयोग होईल अशा प्रकारच्या भाषेचा नमुना मला प्रयत्न करून मिळाला नाही त्यामुळे त्यासबधी मी अधिक विवेचन येथे करीत नाही असो

ज्याप्रमाणे प्राचीन वस्तु-सशोधनाला या विभागात मुबलक क्षेत्र उपलब्ध झाले आहे, ही गोष्ट कोंडापुर उत्खननावरून सिद्ध झाली आहे, त्या प्रमाणे मराठी भाषा आणि साहित्य याना उपयोगी पडेल अशी बरीच उपयुक्त माहिती उपरिनिर्दिष्ट विभागातील भाषाचे आस्थापूर्वक सशोधन केल्यास मिळण्याची आशा आहे, असे, आतापर्यंत या सबधी मी जो प्रयत्न केला, त्यावरून मला वाटते



## श्री चक्रधरप्रभूचे टीकाकार

महानुभाव पथाचे सस्थापक श्री चक्रधरप्रभु याच्या चरित्रासबधी आतापर्यंत बरेच लिखाण प्रसिद्ध झाले आहे महानुभाव महताचे लेख सोडल्यास पथाबाहेरील विद्वानाच्या लेखाचे प्रमाण पाहिले असता त्यात अनुकूल पेक्षा प्रतिकूल टीकेचे पारडे जरा जड झाल्यासारखे वाटते त्यामुळे महानुभाव लोकाना अशा टीकेबद्दल वैषम्य वाटणे साहजिक आहे कारण श्रीचक्ररप्रभु हे केवळ पथप्रवर्तकच नव्हे तर एक अवतारी पुरुष होऊन गेले अशी महानुभाव लोकाची श्रद्धा आहे आणि अशा आदरयुक्त श्रद्धनेच ते श्री चक्रधराच्या अवतारकार्याकडे पहातात परन्तु अलीकडे काही लेखक या गोष्टीकडे दुर्लक्ष करून आपल्या प्रतिकूल टीकेने महानुभावाच्या धर्मभावना दुखवितात या लिखाणासबधी त्याचे असे म्हणणे आहे की, टीका करावयाचीच असेल तर महानुभाव ग्रथाचा चागला खोल अभ्यास करून मग करावी परतु काही टीकाकार 'उगीच काही हाताशी लागेल तेवढे वाचून मूळ गर्भितार्थाला बगल देऊन अर्थाचा अनर्थ करतात अथवा सगळे ग्रथ न वाचता काही तरी इकडचे तिकडचे उतारे घेऊन वडाची साल पिपळाला लावून लोकात पथासबधाने गैरसमज पसरविण्याचा अश्लाघ्य प्रयत्न करतात धर्मभावनेच्या दृष्टीने पाहिल्यास त्याची ही तक्रार योग्य वाटते

आपल्या ह्या भारतात आतापर्यंत अनेकधर्मपंथ निर्माण झाले आहेत त्याच्या संस्थापकांनी आपल्या उदात्त उपदेशाने बहुजन सामाजाचे मार्गदर्शन केले आहे सामान्य व्यक्तीपेक्षा हे धर्मप्रवर्तक उच्चकोटीतील असल्यामुळेच त्याना लक्षावधि अनुयायी मिळाले आणि त्याच्या वचनाना वेदतुल्य धर्मग्रथाच्या मान्यतेचा लाभ झाला तेव्हा त्याच्या या उच्च आणि पवित्र विचाराप्रमाणेच त्याचे आचरण असणार अशी अनुयायाची समजूत असते श्री चक्रधर प्रभूच्या अवतारकार्यासबधी महानुभावाची देखील अशा प्रकारची समजूत असल्यास तीत काही अयोग्य आहे असे म्हणता येणार नाही दुसरे असे की, श्री चक्रधरप्रभूच्या ज्या लीलाचरित्रातील विधानाचा आधार घेऊन हे लेखक टीका करतात, त्याच ग्रथात श्री चक्रधरानी आपल्या शिष्याना सिद्धातसूत्रासारख्या उदात्त तत्त्वाचा उपदेश करून आचारधर्म सागितला आहे तेव्हा जो महात्मा दुसऱ्याना पवित्र आचरणाचा उपदेश करतो तो स्वत च्या बाबतीत मात्र त्या धर्माचे पालन करीत नसेल असे कसे म्हणता येईल ? ही विचारसरणी पुढे ठेवूनच महानुभाव महत टीकाकाराना असे सागत असावेत की, त्यानी टीका करण्यापूर्वी पथात मान्यवर पावलेल्या पडिताच्या गाठीभेटी घेऊन त्याच्या जवळच्या हस्तलिखित ग्रथातून चिकित्साबुद्धीने मथन करावे आणि मग टीका करावी महानुभाव महताची ही विचारसरणी तत्त्वदृष्टया योग्य असली तरी पण तिची अमलबजावणी करणे बरेच कठीण आहे कारण हस्तलिखित महानुभाव ग्रथ साकेतिक लिपीत असल्यामुळे त्याचा अभ्यास लिपीच्या अभ्यासावाचून अशक्य आहे या बाबतीत नवीन अभ्यासकाला महानुभाव महताच्या मार्गदर्शनावरच अवलबून राहावे लाग-

णार परतु ही अडचण ज्या विद्वानानी आपल्या दीर्घ परिश्रमाने आतापर्यंत अनेक प्राचीन महानुभाव पोथ्याचे सपादन आणि प्रकाशन करून दूर केली त्याच्या प्रकाशित ग्रथाचा पथाबाहेरील लेखकाने आपल्या अभ्यासासाठी उपयोग करू नये का? मान्यवर महताच्या गाठीभेटी घेऊन त्याच्याजवळच्या हस्तलिखित पोथ्याचा अभ्यास करण्यास ज्या अर्थी हे महानुभाव सागतात त्या अर्थी डॉ य खु देशपाडे, श्री ह ना नेने आणि प्रो कोलते यानी या बाबतीत जे परिश्रम केले ते फुकटच गेले म्हणावयाचे? परतु या सपादकानी लीलाचरित्रादि ज्या महानुभाव पोथ्या प्रसिद्ध केल्या त्या त्यानी मूळाला धरूनच प्रसिद्ध केल्या असल्या पाहिजेत इतकेच नव्हे तर त्याचे सपादन महानुभाव महताच्या समतीने आणि मार्गदर्शनानेच झाले असले पाहिजे हे सपादक पथीय जरी नसले तरी पण महानुभाव वाङमयाचे मोठे आस्थेवाईक अभ्यासक समजले जातात प बाळकृष्ण शास्त्री महानुभावासारखे थोर महत आपल्या ग्रथात त्याचा आदराने उल्लेख करतात डॉ देशपाडे आणि श्री नेने याना महानुभाव धर्मातील पूज्य विभूति सबधाने फार आदर वाटतो ही गोष्ट महानुभाव महत अमान्य करणार नाहीत. प्रस्तुत स्थळी या प्रसिद्ध ग्रथाच्या आधारानेच श्री चक्रधर प्रभुसारख्या पूज्य विभूति सबधाने योग्य आदर ठेवून दोन शद्ब लिहिण्याचा प्रयत्न केला आहे

परतु श्री चक्रधर स्वामीच्या अवतारकार्यासबधी चर्चा करणे ही गोष्ट आज देखील म्हणावी तितकी सोपी नाही त्या बाबतीत बऱ्याच अडचणीना तोड द्यावे लागेल श्री चक्रधर प्रभु हे एक थोर अवतारी पुरुष होऊन गेले असल्यामुळे त्याच्या चरित्रातील लीळा म्हाइभटा सारख्या पडिताने मोठ्या भक्ति

भावाने वर्णन केल्या आहेत आणि म्हणून या ग्रथाला धार्मिक स्वरूप प्राप्त झाले आहे ज्याप्रमाणे ज्ञानेश्वर महाराजाच्या चरित्रातील प्रसग अद्भुत चमत्कारानी नटलेले आहेत तसाच प्रकार महानुभावाच्या या चरित्रग्रथासबधाने झालेला आहे. यातील बऱ्याच घटनावर अद्भुत चमत्काराचे आवरण पडलेले आहे तेव्हा हे आवरण दूर करून श्रीचक्रधरप्रभूच्या कार्याचे यथार्थ स्वरूप सागणे बरेच कठीण आहे दुसरे असे की, महानुभाव पथाच्या ज्या विशिष्ट मतासबधी उदाहरणार्थ मूर्तिपूजा, जाति-भेद इ सबधी नियतकालिकातून चर्चा होते, अथवा महानुभाव महत आणि पथाबाहेरील टीकाकार याचे पूर्वपक्ष उत्तरपक्ष होतात ती मते लीळाचरित्रात त्या त्या प्रसगाच्या अनुरोधाने आलेली आहेत तेव्हा त्याचा समन्वय करणे हे देखील म्हणावे तितके सोपे नाही उदारणार्थ मूर्तिपूजेचीच गोष्ट घ्या पथा-बाहेरील लेखक श्री चक्रधर प्रभु मूर्तिपूजेच्या विरुद्ध होते असे मागतात याच्या उलट महानुभाव महत श्रीचक्रधर स्वामी हे मूर्तिपूजेच्या विरुद्ध नव्हते, इतकेच नव्हेतर त्यानी देवताच्या मूर्ति सबधी आदरच दाखविला आहे असे आपले स्पष्ट मत देतात हे दोन्ही प्रकार लीळाचरित्रात निरनिराळ्या प्रसगावरून आढळून येतात

श्रीचक्रधर प्रभु आपल्या पर्यटनात बहुधा देवळात किवा मठात वास्तव्य करीत असत परतु त्यानी स्वत देवळातील मूर्तीची कधी पूजा अर्चा केल्याबद्दल उल्लेख नाही क्वचित् एखाद्या स्थळी तसा उल्लेख आढळतो तो म्हणजे विज्ञानेश्वरा वीडा वाणे हा लीळेत आलेला आहे ती लीळा अशी, "मग गोसावी भीतरी बीजे केले चौकी आगी टोपरे फेडिले मग

फुटा प्रावर्ण करूनि भितरि बीजे केले गाभारा आसन मग माधानीचे उदक घेऊनि लिगासि स्तर्पण केले मग लिगासि (वीडा) वाइला दोन्ही श्रीकरी लिग स्परिशिले" (लीळाच पूर्वार्ध खड ३ पान २२) यावरुन चक्रधर स्वामीनी विज्ञानेश्वराच्या लिगाची पूजा केली हे स्पष्ट दिसते पण हा प्रकार अपवादात्मकच होय एरव्ही त्यानी कधी सध्या देवपूजादि नित्यकर्म केल्याबद्दल उल्लेख नाही स्वत जरी मूर्तिपूजा करीत नसत तरीपण देवताच्या मूर्तिसबधी त्यानी अनादर दाखविल्याचे आढळत नाही, इतकेच नव्हे तर आपल्या शिष्यानी एखादे वेळी देवतेचा जर अपमान केला तर तो देखील त्याना खपत नसे उखला नावाच्या शिष्याने गगाद्वारी 'कोळाईच्या बोबीहुनि पाणी निगत असे तेथ (उखला) आगुळी सुदली उभे गगातीरे गावो नेसी आता माझी आगुळी ने पा " असा देवतेचा उपहास केला तेव्हा चक्रधरानी "उखलेया ऐसे न म्हणिजे की देवतेसी " असे म्हणून त्यानी अशा कृत्याबद्दल आपली नापसती व्यक्त केली दुसऱ्या एका प्रसगी श्रीचक्रधर प्रभूचे बुद्ध विहारात वास्तव्य असताना एका भटाचार्याने बुद्धाची मूर्ति दगडाने फोडली तेव्हा चक्रधर स्वामीनी 'वैरीयाचा देवो जाला, तरीकाई दगडे फोडावा भटाचार्या आपुलेनि अभिमाने देवता दुषीली," असे म्हणून त्याचा निषेध केला या प्रमाणे चक्रधर प्रभु देवताच्या मूर्तिबद्दल जरी आदर दाखवीत असत तरीपण त्यानी आपल्या पथाच्या तत्वज्ञानात 'कैलास वैकुठीचे हरिहर ब्रह्मादिक देवता होती पर परमेश्वरु नव्हेती' असे आपले स्पष्ट मत देऊन परमेश्वराच्या मानाने हरिहर ब्रह्मादिक देवाना गौणस्थान दिले आहे शिवाय देवता या नित्यबद्ध मानल्या आहेत जे देव नित्यबद्ध आहेत ते जीवाचा

उद्धार कसा करणार ? अर्थात् त्याची पूजाअर्चा देखील मोक्ष-दायक नसल्यामुळे परमेश्वराच्या अनन्यभक्ति खेरीज इतर गोष्टी-ना ते तितके महत्व देत नाहीत ह्याच दृष्टीने आऊसा या ब्राह्मण जोगिणीला श्री चक्रधरानी आपल्या महात्मा पथाची जेव्हा दीक्षा देऊन शिष्या केले, तेव्हा तिच्या जवळ असलेल्या सामानात (माता) पितळेची जोगलादेवी आणि तितरिया महुवाचा कृष्णेया अशा दोन मूर्ति निघाल्या त्या तिला त्यानी टाकून देण्यास सांगितले त्यावर आऊने 'जी जगन्नाथा, जोगलदेवी साडिजोजी, कृष्णेया नको साडू हा मज वाट दाखवी' अशी श्री चक्रधराना कळकळीची विनंति केली तरी पण तिचे त्यानी मुळीच ऐकिले नाही यावरून त्याना अनुसरण झाल्यावर आपल्या पथातील भक्तांना मूर्तिपूजा केलेली मान्य नव्हती असेच स्पष्ट दिसते हेच मत आपली एक शिष्या प्रार्थबाई हिला उपदेश करताना 'पाषाणकाष्ट, माती, चित्र याचा देव नाही देव तो अच्छेद अभेद इ' त्यानी सांगितले प बाळकृष्ण शास्त्री महानुभाव यानी आपल्या 'महानु-भावपथ' या ग्रथात 'आपलो भेटि अनुसरण' या स्मृतीवर श्री वा ना देशपाडे याना उत्तर देताना जे मत व्यक्त केले आहे ते देखील अनुसरण अथवा पथाची दीक्षा घेतल्यावर भक्ताने मूर्ति पूजा करू नये या वरील मताला पोषकच आहे श्री चक्रधर शिष्या महदबा हिचा भाऊ आपलो याला सन्निधान झाले होते परतु गोसाव्याच्या निर्याणानतर तो राहाणे घालू लागला आणि देव्हारा माडून मूर्तिपूजा करू लागला ते पाहून महदबा घरात न शिरता श्रीचक्रधराचे नाव घेऊन परतली आपलोला वाटले आपल्या प्रतिमापूजनामुळे महदबा घरात शिरली नाही त्या अर्थी प्रतिमा पाण्यात सोडाव्यात त्याप्रमाणे त्याने सोडल्या त्या-

वेळी त्याला पथाच्या तत्त्वाचा गध नव्हता हे शास्त्रीबुवाचे मत जरी कबूल केले तरी पण "त्याला महानुभाव पथाच्या तत्वाची जाणीव असती तर तो देवताच्या प्रतिमा का बरे पूजत राहिला असता ?" या पडित बाळकृष्ण शास्त्र्याच्या वाक्यावरून महानुभाव पथाच्या तत्त्वाची ज्याना जाणीव झालेली आहे ते मूर्तिपूजा करीत नाहीत हेच सिद्ध होत नाही काय ? महानुभाव पथाचा अनुयायी झाल्यानतर "त्याने इतर देवदेवताची उपासना सर्वथा सोडून दिली पाहिजे तसेच घरातील देवपाटावर पूजेत असलेल्या मूर्ति उचलून देवळात नेऊन ठेवाव्या आणि त्या जागी सबधी पाषाणाच्या मूर्तीची स्थापना करावी" हे पडित बाळकृष्ण शास्त्री याचे विधान श्री चक्रधराच्या नतर प्रचारात आलेल्या पूजाविधीला लागू आहे श्री चक्रधरकाळी ओटयाचा प्रकार सुरू झाला होता सबधी पाषाणाच्या मूर्ति नव्हत्या ह्या सबधीचे 'उल्लेख तत्कालीन ग्रथात आहेत "एथचिया सबधा गेले वोटे गोटे ते आदि करूनि तुम्हा नमस्करणीए कीगा ( उत्तरार्ध पान २६) तेव्हा श्री चक्रधराचे अनुयायी मूर्तिपूजा करीत होते किंवा त्याना मान्य होती हे मत निराधार ठरते

महानुभाव पथात सन्याशी आणि गृहस्थाश्रमी असे दोन प्रमुखवर्ग आहेत त्यापैकी गृहस्थाश्रमी हे समाजातील चातुर्वर्ण्य व्यवस्थेचे पालन करतात परतु परमेश्वराखेरीज इतर देवदेवताच्या मूर्तीचे पूजन वर्ज्य करून सबधी पाषाणाच्या मूर्तीची उपासना करतात तसेच व्रते वैकल्ये मोक्षदायक नसल्यामुळे त्याचाहि त्याग करतात सन्याशी हा जो दुसरा वर्ग आहे त्याला चातुर्वर्ण्याचे बधन नाही हा वर्ग चारी वर्णांत भिक्षा मागून परमेश्वर नामस्मरण करीत कालक्रमणा करतो ह्या वर्गात ब्राह्मणाप्रमाणे

ब्राह्मणेतरानाहि प्रवेश मिळतो व त्याना सन्यास घेता येतो श्री चक्रधर स्वामी स्वत च पथ प्रवर्तक असल्यामुळे त्यानी पाठक नैय्यायिक, आनो आणि आउमा या भक्ताना चातुर्वर्णी भिक्षा करावयाला परवानगी दिली होती परतु नामदेवचार्याना नव्हती ब्राह्मणाप्रमाणेच इतर जातीना देखील चक्रधर आपल्या पथाची दीक्षा देत असत कोथळोबा हा अशाच प्रकारचा शिष्य होता पथात आल्यावर त्याने उमाईच्या पाण्याला स्पर्श केला त्यामुळे तू शूद्र माझे पाणी विटाळलेम असे त्याला ती रागाने बोलली परतु म्हाइभटाने कोथळोबा ह्याना भट मार्गाची दीक्षा असल्या-मुळे बरोबरीचे अधिकार प्राप्त झाले आहेत अशी तिची समजूत केली यावरून त्या काली देखील पथाची दीक्षा घेतल्यानतर चातुर्वर्ण्याचे आचार पाळण्याची आवश्यकता नसे असे स्पष्ट दिसते

चातुर्वर्ण्याप्रमाणे श्रीचक्रधरप्रभु अस्पृश्यता मानीत नसत चाभाराबरोबर ताबूल सेवन करणे अथवा मागाने दिलेला लाडू भक्ताना प्रसाद म्हणून वाटणे ( ली च उत्तरार्ध ३४ ) ही या बाबतीतील उदाहरणे देता येतील प बाळकृष्ण शास्त्री यानी आपल्या ग्रथात 'श्री चक्रधर स्वामी हे परमेश्वराचे अवतार असल्यामुळे त्याच्या दृष्टीत अस्पृश्यता मुळीच नाही, तसेच महानुभाव सन्याशाने अस्पृश्यता मानू नये असे आपले मत दिले आहे

देवगिरीच्या यादवाच्या कारकीर्दीत श्री चक्रधरानी आपले अवतारकार्य केले त्यानी शेवटच्या तीन यादवराजाच्या—म्हणजे कृष्ण, महादेव, आणि रामदेव याच्या राजवटी पाहिल्या होत्या यापैकी कृष्णयादवाने श्री चक्रधराची लोणार येथे भेटहि घेतली होती हे यादवराजे वैदिक धर्माचे अभिमानी आणि सस्कृत विद्येचे पुरस्कर्ते होते पण या वैदिकधर्माचे प्राचीन श्रौतस्वरूप

जाऊन त्याला यादवकालापूर्वीच स्मार्त पौराणिक धर्माचे स्वरूप आले होते श्रौतयज्ञ कमी होऊन त्याची जागा स्मार्त आन्हिकानी घेतली होती या स्मार्त पौराणिक धर्माचे वैशिष्टय म्हणजे पौराणिक देवदेवताची पूजा आणि व्रतवैकल्यावर दिलेला भर हे होय हेमाद्रीच्या चतुर्वर्गचितामणी या ग्रथातील तीर्थखड आणि व्रतखड या प्रकरणावरून तत्कालीन आचार विचाराची कल्पना करता येते लीलाचरित्रातील कथाप्रसगावरून पाहता व्रत वैकल्याप्रमाणेच अधश्रद्धा आणि धर्मभोळेपणा याचे प्राबल्य तत्कालीन समाजात बरेच आढळून येते श्रीचक्रधरप्रभूचे निस्पृह आचरण आणि साधुत्व यामुळे श्रद्धावान लोक त्याच्या भजनी लागत कित्येकाच्या शारीरिक व्यथा व भूतबाधा काही औषधपाणी न करता आपल्या अलौकिक सामर्थ्याने ते दूर करीत त्यामुळे लोकाची त्याच्यावर श्रद्धा बसे श्री चक्रधरप्रभु प्रमाणेच इतरहि अनेक पथाचे योगी महात्मे त्याकाली आपापल्या मताचा प्रसार करीतच होते, लीलाचरित्रात अशा साधूचे आणि महात्म्याचे उल्लेख अनेक स्थळी आढळतात विशेषत नाथपथी साधु याचा भर हटयोग आणि अद्‌भुत चमत्कार यावर असल्यामुळे त्याचीहि प्रसिद्ध तत्कालीन समाजात बरीच होती

श्री चक्रधरस्वामीनी आपल्या आयुष्यात पर्यटन बरेच केले ते एका गावी क्वचितच पुष्कळ दिवस वास्तव्य करीत या प्रवासात त्याना लोकस्थितीचे आणि धार्मिक आचारविचाराचे निरीक्षण करता आले पैठण येथे सन्यासदीक्षा घेण्यापूर्वी त्याचे हे पर्यटन जसे निर्हेतुक तसेच एकाकी होते परन्तु दीक्षा घेतल्यानतर त्याचा शिष्यसमुदाय वाढू लागला आपल्या मतासबधी ते आग्रही नसत स्वत च्या इच्छेने जो त्याच्याजवळ येई त्यालाच

ते उपदेश करीत याप्रमाणे एकादी व्यक्ति पथात आल्यावर मग त्या व्यक्तीवर पथाचे विशिष्ट आचार विचार पाळण्याचे बधन असे असे दिसते उदाहरणार्थ आऊमा या ब्राह्मण जोगिणीला दीक्षा घेतल्याननर आपल्या इच्छेविरुद्ध कृष्णाची मूर्ति दूर करावी लागली तसेच नाथोबाला टिळाजानवे पुरण्यास मागितले असताना त्याने ते चार वेळा उकरून पाहिले यावरून या शिष्यावर पूर्वीचे धार्मिक सस्कार किती बलवत्तर असत हे सिद्ध होते एकीकडे गुरुविणा मोक्ष नाही या तत्वाप्रमाणे गुरूवर परकाष्टेची श्रद्धा ठेवून गुरूच्या उपदेशाप्रमाणे वागण्याची प्रवृत्ति तर दुसरीकडे प्रचलित धर्माच्या आचारविचाराच्या मनावर झालेल्या सस्कारामुळे गुरुचा हा सुधारणावादी उपदेश कृतीत आणताना होणारी द्विधावृत्ति अशा स्थितीत त्याच्या मनाचा गोधळ होई महदबेच्या मनाची काशीयात्रेच्या वेळी "तीर्थक्षेत्र अमोचके ईश्वर सन्निधानमोचक' हा श्री चक्रधराचा उपदेश ऐकून अशीच स्थिति झाली या खेरीज श्री चक्रधराच्या या भक्ताना समाजाची भीति वाटे महदबेने हा उपदेश ऐकून काशीयात्रेचा हा बेत रद्द केला तेव्हा दादोस नावाच्या एका शिष्याने 'गावीचा अवघा लोकु हासैल' अशी तिला समाजाच्या या भीतीची जाणीव करून दिली कित्येकदा या भक्ताना समाजाचा रोष सहन करावा लागतो याची जाणीव श्री चक्रधराना होती उपाध्यायाने श्री चक्रधराचे उष्टे ताबोल मागितले त्यावेळी स्वामीनी "लोकु तुमते नष्टा भ्रष्टा म्हणतील की, गोत्रा कुटुबा वेगळेया करिती थाळा वाटिया जेऊ नसुती" असे त्याला सागितले (ली च पूर्वार्ध खड १ पान ९ ) दुसऱ्या एका प्रसगी सेदुरणी येथील नारायणाच्या देवळातील मासोपवासिनी पैकी एकीने श्रीमुखीचे ताबोळ

मागितले त्यावेळी श्री चक्रधरानी लोकाकडे बोट दाखविले ह्या उष्टया विडयाच्या प्रसादासबधाने गतवर्षी चित्रमयजगत् या मासिकाच्या एका अकात (मे १९४९) प गोविदराज दयाळ-राज महानुभाव यानी प्रो न र फाटक याच्या विधानावर जी टीका केली ती समाधानकारक वाटत नाही या उष्टया प्रसादासबधाने लीळाचरित्रात अनेक ठिकाणी उल्लेख आलेले आहेत भाविक लोकाची साधु सत्पुरुषावर फार श्रद्धा असे सत्पु-रुषाच्या कृपा प्रसादामुळे आपणाला मुक्ति मिळते अशी त्याची समजूत असे त्यामुळे ते श्री चक्रधरामारख्या महात्म्याचा उष्टा प्रसाद मागत त्याच्या या कृत्यामुळे समाजात टीकाहि होई नागाबिकेने चक्रधराचा उष्टा प्रसाद घेतल्यामुळे हसराजु आणि पाडे तिची निदा करू लागले 'हे काई जाले या नागुबाईसी चळली काइ नेणो कोण आणिला असे तेयाचे उमीटे खाती असे पायवणी पीती असे ' श्री चक्रधर स्वत उष्टा प्रसाद देत नसत एका बाईने 'परपुरुषाचे मी उष्टे खात नाही' असे म्हणून स्वामीचा उष्टा विडा घेतला नाही त्यावेळी त्यानी केळयाचा प्रसाद तिला दिला या बाबतीत भाविक लोकानी जरी त्याना आग्रह केला असला तरीपण त्यानी उपदेश करून त्याचा निषेध केला असता तर ही चाल बद झाली असती गोदावरीच्या काठी पैठण, पुरुषोत्तमपुरीसारखी वसलेली गावे अग्रहारे असल्यामुळे विद्वान आणि कर्मठ ब्राम्हणाची वस्ती अशा अनेक गावातून जास्त होती ज्यावेळी श्री चकधराचे वास्तव्य एखाद्या गावात होई त्या-वेळी या धार्मिक आचार विचाराबाबत आपल्या शिष्यानी जास्त दक्षता घ्यावी असा त्याचा कटाक्ष असे एकदा त्याचे वास्तव्य गोदावरीच्या काठी एका गावी होते त्याचे भक्त 'गगेला गेले

आणि सध्या करू करू आले परि टिळे न लवीतिचि," तेव्हा चक्रधरानी त्याना "टिळे लाविजे की गा हे गगातीर येथ तीथ-व्रारु जाणवावा" असे सागितले एकाद्या ब्राम्हणाने त्याचा उपदेश ऐकून स्नानसध्या, देवपूजा व षट्कर्म जर सोडून दिले तर घरातील माणसे त्याला वेड लागले असे म्हणत आणि ही स्थिति चकधराच्या उपदेशामुळे झाली असावी अशी आपली समजूत करून घेत

श्रीचक्रधरप्रभूची निस्पृहता, अहिसा वृत्ति आणि प्राणी-मात्रावर निर्हेतुक प्रेम करण्याचा त्याचा अलौकिक गुण यामुळे त्याची लोकप्रियता वाढू लागली त्याच्या व्यक्तिमत्त्वाचा, प्रेमळ-पणाचा आणि निर्लोभवृत्तीचा भेटीला येणाऱ्या व्यक्तीवर तात्काळ परिणाम होई ते एक थोर सिद्धपुरुष आहेत अशी भाविक लोकाची त्याच्यावर श्रद्धा बसे त्यामुळे समाजात त्याच्या विषयी आदर उत्पन्न झाला गावातील महाजन त्याचे स्वागत करू लागले राक्षसभुवनाजवळ बल्हेग्राम (बळेगाव) यागावी त्याचे एखाद्या सस्थानिकाप्रमाणे स्वागत झाले स्वत महादेव यादवाने त्याची भेट घेण्याचा एकदोनदा प्रयत्न केला स्वामीची ही वाढती लोकप्रियता पाहून ब्रम्हसान आणि महदाश्रमा सारखे वैदिक सन्याशी त्याचा द्वेष करू लागले मूर्तिपूजा वर्णाश्रम धर्म आणि अस्पृश्यता यासबधी श्री चक्रधराची तत्कालीन समाजाला वाटणारी क्रातिकारक मते आणि त्याच्या भक्ताचे आचार विचार पाहून "श्री चागदेव राउळ (चक्रधर) आमचा मार्ग उच्छेदिती" असा त्याच्यावर आरोप करू लागले इतकेच नव्हे तर त्यानी त्याच्यावर विषप्रयोग यत्रासना सारखे प्रकार केले परतु श्रीचक्रधर ह्या आपत्तीतूनहि वाचले यावरून

असे वाटते की, इतर साधुसताप्रमाणे श्रीचक्रधरानी समाजातील धार्मिक आचार विचाराना धक्का देणारा उपदेश करून आपला सप्रदाय जर वाढविला नसता तर प्रतिष्ठित वर्गाचा त्याना विरोध झाला नसता कारण त्याचे गुरु गुडमराउळ हे देखील या दृष्टीने कमी क्रातिकारक नव्हते नवरात्रात महाजनानी नवचडीकरिता माडलेला घट श्री गुडमराउळानी लाथ मारून खाली पाडला आणि वर बाधलेल्या फुलोऱ्याचा विध्वस केला तेव्हा महाजनानी राउळाला एका शद्बानेहि दुखविले नाही उलट त्यानी "आमचे राउळ ऐसे नव्हेती ए सोवनीये आली एहि आमुचे राऊळ नाशिले " असे गुडमराउळाना प्रशस्तिपत्र देऊन सेउण-देशीय (देवगिरी प्रात) श्रीचक्रधराच्या भक्ताना दूषण दिले यावरून श्रीचक्रधराच्या शिष्याची आपल्या सुधारकी आचार विचारा बावत वऱ्हाडात देखील प्रसिद्धि झाली होती असे दिसते हे गुडम राउळ मातगाच्या पाणपोइचे पाणी पीत आणि कुणब्या-च्या घरी जाऊन भाकरी खात एकदा गुडमराउळ कुणब्याची भाकरी खात बसले असताना साधा नावाच्या ब्राह्मण शिष्यीणीने त्याचा उष्टा प्रसाद घेतला तेव्हा कुणबिणीने 'काइवो जाले या ब्राह्मणाचिया राडासी आमचे कुणबीयाचे अन्न खाति' अशा शिव्या दिल्या, परतु गुडमराउळा सबधाने एक चकारशब्दहि काढला नाही यावरून तत्कालीन समाजात सतामहतासबधाने पूज्य बुद्धिच वसत होती त्याचे आचार विचार प्रचलित धर्माला किती-हि विरुद्ध असले तरी त्यामुळे लोकाची श्रद्धा कमी होत नसे परतु इतरानी तसे वर्तन केल्यास ती गोष्ट समाजाला खपत नसे, समाजाकडून त्याचा धिक्कार होई गुडमराउळाच्या या आचारा-च्या बाबतीत वैदिक सन्याशी कधी कधी " राउळ भ्रष्टाभ्रष्ट

करिती'' इतकेच म्हणून त्याच्या बरोबर भोजनादि व्यवहार टाळीत परतु गावातील प्रतिष्ठित लोक देखील 'राउळाचा गावो'' अशी त्याची बाजू घेऊन सन्याशाना उत्तर देत कोणत्याहि वैदिक सन्याशाने अथवा प्रतिष्ठित माणसाने गुडमराउळ आमचा मार्ग उच्छेदिती असे म्हटलेले नाही

श्री चक्रधरस्वामीच्या शिष्यपरिवारात स्त्रियाहि बऱ्याच होत्या नागाबिका, महदबा, आऊसा इ शिष्यीणी प्रमुख होत्या ह्यापैकी बऱ्याच विधवा होत्या त्या श्रीचक्रधरा सन्निध राहून त्या त्रे सेवादास्य करीत असत पुरुषाप्रमाणे स्त्रियानाहि परमेश्वराची उपासना करून मोक्ष मिळविता येतो असे स्वामीचे मत होते तसेच त्याना पथाची दीक्षाहि घेता येते असा त्याचा उपदेश असे श्रीचक्रधरकाली विधवाची स्थिति मोठी करुणाजनक होती ज्ञानेश्वरानी या विधवा सबधाने ''भ्रतारे हीन वनिता । उपहती पावे सर्वथा '' असे दु खाचे उद्‌गार काढले आहेत समाज तिच्याकडे सहानुभूतीच्या दृष्टीने पहात नसे उलट तिची कुचेष्टा व उपहास करीत असे त्यामुळे त्या व्रते उपवास करून देहदडन करीत अथवा गुरूचा उपदेश घेऊन परमेश्वराची भक्ति करीत श्री चक्रधरानी आपल्या पथात त्याना समानाधिकार दिले परतु पथात आल्यावर अशा विधवा स्त्रिया पुरुष सन्याशाप्रमाणे मुडण करीत नसत असे दिसते ब्राह्मण विधवाच्या केशवपनाची चाल महाराष्ट्रात यादवकाली किवा यादवाच्यापूर्वी नव्हती ती मुसलमानी अमदानीत सुरू झाली कारण यादव कालापूर्वीच्या स्मृतीत या चालीचा उल्लेख नाही फक्त वेदव्यास स्मृतीत आहे परतु ती प्राचीन नाही तसेच ताम्रपटात किवा परकीय प्रवाशाच्या हकीकतीत तिचा उल्लेख नाही लीळा चरित्रात देखील या

विधवा शिष्यणीनी मुडण केल्याबद्दल उल्लेख नाही एकदा श्री चक्रधराच्या पाघुरणात एक ऊ निघाली तेव्हा ह्या सेवादास्य कर-णाऱ्या शिष्यीणीचे मुडण करावे असे ते विनोदाने म्हणाले तसेच दुसऱ्या एका 'प्रसगी तुम्ही सात बाइया हे एकले बोडके' असे म्हणाले यावरून विधवा केशवपन करीत नसत असे दिसते तेव्हा बाळकृष्णशास्त्री यानी टीकाकाराना उत्तर देताना "ब्राह्मण विधवा मुडण करतात तो एक प्रकारचा सन्यासच आहे मग महानुभाव विधवानी मुडण केले तर त्याना हरकत का असावी' अशा प्रकारचे आपले मत दिले आहे ते पटत नाही परतु रज-स्वला स्त्रिया दूर बसत या चालीसबधी कडक निर्बंध असे आजही ती प्रचारात आहे परतु श्रीचक्रधरानी आपल्या उपदेशाने ती कमी करण्याचा प्रयत्न केला उमाइ नावाची एक शिष्यीण विटाळशी असल्यामुळे दूर बसली तेव्हा गोसाव्याने तिच्या कपा-ळाला आपल्या आगठ्याने स्पर्श केला आणि स्वत च विनोदाने 'हे काइबाइ एथचे या आगुठेयासि विटाळु केला आता हा (आगठा) लोणारा नेयावा लागेल" असे म्हणाले त्यानतर त्यानी बाईच्या प्रश्नाला उत्तर म्हणून "बाई ये नवद्वारे जैसी नाकी शेबूड ऐसी हे एकी धातु स्रवे मग निवर्ते' याचा विटाळ धरू नए " असे सागितले यावरून स्वामीना लिगायत पथा-प्रमाणे स्त्रियाचा मासिक विटाळ मान्य नव्हता हे उघड दिसते

ज्या विधवाना जवळचे असे पुरुष आप्त नसत त्यांना श्री चक्रधराच्या जवळ राहण्याला अडचण पडत नसे परतु ज्याना तसे पालक असत त्याना मात्र फार अडचण पडे कालिदास भटाची तरुण मुलगी विधवा 'झाली तेव्हा नागाविकेने तिला श्री चक्रधराचे सेवादास्य करण्यास मागितले परतु बापाला जेव्हां

ही गोष्ट समजली तेव्हा त्याने "का राहावीतिना देखीलिसी तरुणीधारी या महात्मेयाचेयाचे ते ऐसेचि की," अशी श्री चक्रधराची निदा केली महदबेचे आईबाप 'रुपै ( महदबा ) वाया गेली' असे म्हणत दादोससारखे स्वामीचे शिष्य देखील याबाबतीत त्याची कधी कधी निदा करीत उदा साधा नावाच्या एका तरुण शिष्यीणीला श्री चक्रधरानी आपल्या गळ्यातील पुष्पमाला दिली ते पाहून दादोसाने 'ऐसे आमचे गोसावी राडाबाईला माळ देती" अशी टीका केली ब्रह्मचारी देवाच्या गुफेतील सडा घालणाऱ्या स्त्रियानी श्रीचक्रधराना क्षेमालिगन दिले त्यामुळे श्रीचक्रधराचा फुटा (पागोटे) सेणाने माखला हे पाहून लिगाच्या देवळातील ब्राह्मणानी "बाहुल्ये श्रीचागदेव राउळाचा ठाइ स्त्रियासाची वेधु" असे म्हटल्यावर त्या बाईने क्षेमालिगन सोडले आपल्या शिष्यीणी सबधाने समाजामध्ये निदा होते या गोष्टीची जाणीव चक्रधराना होती असे दिसते ते एकदा भिगाराला जाण्यास निघाले असताना साधेने बरोबर येण्याचा आग्रह केला तेव्हा चक्रधरानी "तुम्ही सात बाईया हे एकले बोडिके तरि लोकू विरुध की तुम्ही एथ असा" असे तिला सागून बरोबर येऊ दिले नाही साधेची आई देखील साधेला एकटीला गोसाव्या बरोबर पाठविण्यास तयार नव्हती ती म्हणाली "एल्हो (साधा) धाकुटी मज यावेची लागेल एऱ्हवी गोत्र कुटुबाचा बोलु लागेल" वस्तुत एका दृष्टीने हे उल्लेख तत्कालीन समाजातील पुरुषाची स्त्रियासबधी परपरागत सकुचित आणि साशक वृत्तीच दर्शवितात. श्री चक्रधराप्रमाणेच नतरच्या इतर काही सता महतासबधाने–(अर्थात महानुभाव सोडून) देखील अशा प्रकारचे लोकमत आढळून येते तेव्हा त्याकडे विशेष लक्ष देण्याचे कारण नाही असे वाटते परतु

काही लीळातील प्रसग समाजाच्या या टीकेला पोषक असेच दिसतात हे पाहून आश्चर्य वाटते उदाहरणार्थ – जोमाई नावाच्या एका बाईला सुपली वाजवून आपल्यापुढे श्री चक्रधरानी नाचण्यास सागितले त्याप्रमाणे ती नाचली साधेला आपल्याबरोबर जलक्रीडा करण्यास गोसाव्यानी बोलावले परतु तिच्या आईने नकार दिल्यामुळे तो बेत रद्द करावा लागला आऊसा या जोगिणी सबधीच्या लीला तर वरील निदेला जास्तच पोषक ठरतात ही जोगीण पूर्वी नाथपथी होती बाईसाला तिची वागणूक पसत नसे स्वत चक्रधर स्वामी तिच्या सबधाने " पोरी आऊवेसी मी स्त्री ऐसी बुद्धि नाही पुरुष ऐसीची बुधि स्त्रीत्व हे उच्छेदौनी गेले" असे म्हणत असत अशा स्त्रीला श्रीचक्रधरानी तशा प्रकारे नाचण्यास आणि क्षेमालिगण देण्यास सागावे आणि तिनेहि निरुपायाने गुरूची आज्ञा मानावी हे पाहून मनाला खेद वाटतो या सबधीच्या लीळाची माहिती देणे सदभिरुचीला सोडून असल्यामुळे येथे देत नाही "आउपुष्टि आरोहन, भएचकित आउ समसानी बैसवणे, आउसा करवि मुनियाशी क्षेमालिगन देववणे आणि आउ नृत्यकरणी रात्रि करणे ( लीलाच उत्तरार्ध पान २४५ ते २४७) या त्या चार लीळा होत ज्या चक्रधरस्वामीनी आपल्य एकाकी पर्यटनात निपुत्रिक ठाकुराच्या बायकोला परत पाठविले अथवा पाठकाने आपली बायको अर्पण केली असता तिचा स्वीकार केला नाही त्याच महात्म्यानी आपल्या शिष्यीणीला अशा प्रकारे नाचण्यास सागावे या गोष्टीची सगति कशी लावावी? एकाकातील तेलीणीच्या बाजेवर झोपल्या सबधीची जी लीळा आहे त्या विषयी प्रो न र फाटकाना महत गोविदराज महानुभावानी श्रीचक्रधर त्यावेळी विदेही अवस्थेत होते असे उत्तर

देऊन समाधान करण्याचा प्रयत्न केला आहे तेलीणीच्या लीळे-तील स्वामीची विदेही अवस्था जरी मान्य केली तरी पण आउसा मबधीच्या लीळा विदेही अवस्थेत झाल्या असे कसे म्हणता येईल? बरे ही लीळा प्रक्षिप्त म्हणावी तर तसाहि प्रकार दिसत नाही रत्नमाला स्तोत्रात ही लीळा भाषातर रूपाने आली आहे या दृष्टीने श्रीचक्रधराचे गुरु गुडमराउळ आणि त्याचे गुरु श्रीचक्र-पाणी राउळ याचें या बाबतीतील धोरण पाहून मनाला फार ममाधान वाटते श्री गुडमराउळ हे स्वत खरोखर विदेही वृत्तीचे होते लोक त्याना वेडेपिसे म्हणत आणि वागतहि ते पिशाच्य वृत्तीने ! परतु शेवटपर्यत त्यानी नैष्ठिक ब्रह्मचर्य व्रताचे पालन केले ईश्वरनायक आपली कन्या विवाहासाठी द्यावयाला उत्सुक असतानाहि ते फार रागावले आणि अशा लग्नाला त्यानी स्पष्ट नकार दिला ज्या साधेबरोबर श्रीचक्रधर जलक्रीडा करण्यास तयार झाले त्याच साधेला पडदणी न घेता आघोळ करताना पाहून गुडमराउळ रागाने मारावयाला धावले त्याचे गुरु चक्र-पाणी याची नैष्टिक ब्रम्हर्याबद्दल प्रसिद्धीच होती त्यानी काउर-ळीची वेश्या कामाख्या हिला गुफेत प्रवेश न करण्याची आज्ञा केली होती. परतु सात दिवसानी तिने हट्टाने प्रवेश करण्याचा प्रयत्न केला त्यावेळी त्यानी आपल्या देहाचे विसर्जन करून ब्रम्हचर्याचे पालन केले यावरून श्रीचक्रधराचे वर्तन विदेही अवस्थेमुळे झाले हे मत पटत नाही

लीलाचरित्रातील असे काही प्रसग वगळल्यास श्री चक्र-धरस्वामीनी आपल्या आयुष्यात धार्मिक आणि सामाजिक सुधा-रणेचे थोर कार्य केले त्याची मते तत्कालीन पुराणप्रिय समाजाला क्रातिकारक वाटणे साहजिक आहे जी अस्पृश्यता आज सरकार

कायद्याने नाहीशी करण्याचा प्रयत्न करीत आहे ती श्रीचक्रधरानी सहासातशे वर्षांपूर्वी प्रतिकूल परिस्थितीत आपल्या आचरणानी कमी करण्याचा प्रयत्न केला यावरून त्याची दृष्टि किती पुरोगामी होती याची साक्ष पटते त्याच्या स्वभावात असे काही अलौकिक गुण होते की ते जेथे जेथे जात तेथे तेथे भाविक लोक त्याच्या भजनी लागत त्या गुणापैकी प्राणीमात्रावर निर्हेतुक प्रेम करण्याची त्याची वृत्ति कौतुकास्पद वाटते आपल्या भक्तावर तर ते प्रेम करीतच असत ह्यात काही नवल नाही परतु महदाश्रमासारख्या सन्याशी शत्रूलाहि त्यानी दुखविले नाही एका पडक्या देवळाला नागदेवाचार्याने महदाश्रमाच्या पूजेची उपमा दिली तेव्हा चक्रधरानी त्याचा निषेध करून "तुम्ही महात्मे की गा तुम्हा मारिता पूजिता समानचि होआवा की गा मुक्तीची चाड तेणे मुगिए वारु न चितावे" असा उपदेश केला. स्वामीच्या या अलौकिक गुणवैशिष्टयाकडे पाहून श्री ज्ञानेश्वराच्या 'अद्वेष्टा सर्व भूताना मैत्र करुण एवच' इ श्लोकावरील " जो सर्व भूताच्या ठायी । द्वेषाते नेणेचि कही। आपपरु नाही। चैतन्या जैसा" या उद्गाराची आठवण होते श्रीचकधरानी आपल्या आयुष्यात ज्या सन्यासप्रधान भक्तिपथाची स्थापना केली त्याचा विस्तार त्याच्या अनुयायानी काबुल कदाहारसारख्या मुसलमानी प्रदेशापर्यत केला तसेच मराठीला धर्मभाषेचा मान दिल्यामुळे महानुभावानी या भाषेत अनेक ग्रथ रचून साहित्याच्या क्षेत्रात मोठी कामगिरी केली आहे मध्यतरीच्या काळात या पथातील काही आचार वैशिष्टयामुळे हिदुधर्मात बरेच गैरसमज पसरले आणि आणि त्यामुळे बेबनाव उत्पन्न झाला परतु आज ती स्थिति राहिली नाही कारण ह्या पथातील बरेचसे वाङमय प्रकाशित

झाल्यामुळ त्याचा निरनिराळ्या विद्यापीठातून देखील आस्थेने अभ्यास होऊ लागला आहे वेदासारख्या प्राचीनतम आणि हिदु-धर्माला पूज्य अशा धर्मग्रथावर त्याच धर्मातील थोर थोर पडित एक अभ्यासाचा विषय ह्या दृष्टीने अनुकूल प्रतिकूल टीका कर-तात हे आपण पाहतो इतकेच नव्हे तर हिदु धर्मातील आचारा-सबधी गुणदोषाचे विवेचन कै लो टिळक आणि म म काणे याच्या सारखे विद्वान किती प्राजलपणे करतात ही गोष्ट स्वत प बाळकृष्णशास्त्री यानी मान्य करून त्याची मते त्यानी आपल्या ग्रथात दिली आहेत असे जर आहे तर त्याच हिदु धर्मातील महानुभावासारख्या एका वैष्णव पथासबधाने तात्विक भूमिके-वरून जर चर्चा झाली तर महानुभाव म्हतानी विषाद न मानता अशा टीकेला शातपणाने उत्तर द्यावे श्रीचक्रधरस्वामीनी आपल्या आयुष्यात मूर्तिपूजा, अस्पृश्यता, इ सबधी ज्या सुधारणा केल्या त्यापैकी किती आज अमलात आल्या आहेत ? हिदुधर्माप्रमाणेच महानुभाव अस्पृश्यता मानतात हा देखील रूढीचाच परिणाम नाही काय ? मग हिदुधर्मातील रूढ आचारविचाराना दोष देण्यात काय अर्थ आहे? परतु महानुभाव पडित स्वमत समर्थनार्थ वैदिकधर्मातील दोष दाखविण्याचा प्रयत्न करतात तेहि बरोबर वाटत नाही कारण त्यामुळे स्वत च्या मताचे समर्थन कसे करता येईल ? येथे दुसऱ्याहि एका गोष्टीसबधी विचार करणे आवश्यक वाटते टीकाकार एखाद्या लीळेचा आधार घेऊन श्रीचक्रधराच्या आचरणातील काही आक्षेपार्ह प्रसगाचे आपल्या लेखात विवेचन करतात तेव्हा महानुभाव महत सूत्रपाठातील तत्सबधी वचनाचा उल्लेख करून टीकाकाराची विधाने निराधार ठरविण्याचा प्रयत्न करतात परतु लीळाचरित्र ग्रथाची रचनाच अशा पद्धतीची आहे

की कथाप्रसगाची हकीकत आधी देऊन त्यावर श्री चक्रधरस्वामीची सिद्धातवचने आली आहेत उ महदबेच्या यात्रेसबधीची लीळा, अथवा मार्गी म्हाइभटा भेटी ही लीळा पहावी तेव्हा या गोष्टीचा समन्वय कसा करावयाचा ?

असो येथवर श्री चक्रधरप्रभूच्या कार्यासबधी आणि त्या कार्यावर टीकाकार जे आक्षेप घेतात त्यासबधी थोडक्यात वर विवेचन केले आहे हे विवेचन करताना दोन्ही पक्षाचे दृष्टिकोण लक्ष्यात घेऊन श्रीचक्रधरप्रभूच्या काही थोर गुणाचे दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न केला आहे परतु त्याबरोबर चरित्रग्रथाच्या विशिष्ट रचनेमुळे त्याच्या आयुष्यातील काही प्रसगाना अनुलक्षून जी टीका होते, ती महानुभाव महताना पूर्वग्रहदूषित आणि एकतर्फी वाटत असली तरीपण एकदर चरित्रग्रथाचा विचार करता सर्वच निर्मूल वाटत नाही अर्थात् अशा टीकालेखात काही काही ठिकाणी समतोलपणाचा अभाव आणि मार्मिक अभ्यास न करिता घेण्यात आलेले आक्षेप असे प्रकार दिसतात अशा आक्षेपासबधी महानुभाव महतानी उत्तरपक्ष करून निराकरण अवश्य करावे परतु जी टीका मूळाला धरून योग्य रीतीने करण्यात येते त्या टीकेसबधी गैरलागू मुद्दे उपस्थित न करिता समतोलपणाने साधार उत्तर द्यावे अशा उत्तराचे कुणीहि स्वागतच करील

———

# देवगिरीचे यादव आणि धार्मिक पंथ

महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासात यादवाचा काल फार महत्त्वाचा गणला गेला आहे या कालात भिल्लम यादवाने सोमेश्वर चालुक्याचा पराभव करून देवगिरी येथे स्वतत्र राज्याची स्थापन केली 'तसेच त्याच्या वशजानी गुजरात, माळवा, तेलगण आणि कर्नाटकासारखे प्रात पादाक्रात करून महाराष्ट्राचे राज्यवैभव वाढविले स्वातत्र्यप्राप्ती नतर यादवानी आपल्या राजवटीत राज्यविस्तारासाठी इतर राजाशी बऱ्याच लढाया केल्या तरीपण महाराष्ट्रातील आपल्या प्रजेला त्यानी सुखाचे दिवस दाखविले धार्मिकदृष्टयाहि हा काल कमी महत्त्वाचा नाही हेमाद्रि बोपदेवा सारख्या थोर पडितानी धर्मशास्त्रावर निबध रचून वैदिक धर्मातील आचार विचाराचे आसन स्थिर करण्याचा याच कालात प्रयत्न केला परतु या प्रयत्नाने बहुजन समाजाचे समाधान होणार नाही हे ओळखूनच की काय महानुभाव आणि वारकरी सप्रदायासारखे धार्मिक पथ याच कालात उदयास येऊन त्याच्या अनुयायानी लोकाना भक्तिमार्गाचा उपदेश केला त्याकरिता त्यानी समकालीन शास्त्री पडिता प्रमाणे सस्कृतभाषेचा अवलब न करिता मराठी सारख्या लोकभाषेला धार्मिक भाषेचे स्थापन दिले आणि यातच त्याच्या कार्याचे वैशिष्टय आहे या कालातील सतामहतानी या दृष्टीने मराठी साहित्याची जी सेवा केली ती केव्हाहि अपूर्वच म्हणावी

लागेल ज्ञानेश्वरी सारखा अलौकिक ग्रथ रचून ज्या सत शिरोमणीने महाराष्ट्राला मार्गदर्शन केले त्या ज्ञानेश्वर महाराजाचे कार्य शेवटचा वैभवशाली यादवराजा रामदेव याच्या राजवटीतच झाले अशा या सपन्न कालात ज्या महात्म्यानी आपापल्या पथाचा प्रसार करून बहुजन समाजात धर्मजागृति केली, त्याना यादवाचा आश्रय होता किवा नाही, समकालीन धर्मपथासबधाने यादवराजाचे धोरण कसे होते, त्यानी आपल्या राज्यात निर्माण होणाऱ्या मराठी साहित्याला उत्तेजन दिले किवा नाही इत्यादि प्रश्न विचार करण्यासारखे आहेत प्रस्तुत निबधात या विषयावर दोन शब्द लिहिण्याचे ठरविले आहे

भिल्लम यादवाने सन ११८९ या वर्षी स्वातत्र्य सपादन करून देवगिरी येथे गादी स्थापन केली हे वर सागितलेच आहे त्यापूर्वी यादव हे सेऊण यादव या नावाने प्रसिद्ध असून ते आधी मलखेडच्या राष्ट्रकूटाचे आणि नतर कल्याणीच्या उत्तर चालुक्याचे माडलिक होते या राष्ट्रकूट चालुक्याचा मध्ययुगीनकाल दक्षिणेत धार्मिक आदोलनाच्या दृष्टीने बराच प्रसिद्ध आहे या काळात किबहुना या कालापूर्वीच वैदिकधर्माचे जुने श्रौत आचार कमी कमी होऊन त्याला बहुजन समाजात स्मार्त-पौराणिक धर्माचे स्वरूप प्राप्त झाले होते सुप्रसिद्ध श्रौताचार्य कुमारिलभट्ट याने वैदिकधर्माचे हे प्राचीन स्वरूप टिकविण्याचा जरी प्रयत्न केला तरी पण त्याला यश आले नाही या दृष्टीने कुमारिलभट्टापेक्षा श्रीशकराचार्याचे कार्य जास्त प्रभावी आणि यशस्वी झाले याचे कारण स्वत शकराचार्य वैदिक कर्मकाडापेक्षा कर्मसन्यासाचे पुरस्कर्ते होते श्रौतयज्ञ मोक्षदायक नसून खरा मोक्ष ज्ञानानेच मिळतो असे त्याचे मत होते दुसरे असे की,

शिव आणि विष्णु सारख्या पौराणिक देवताच्या उपासनेला त्यानी मान्यता दिली होती ही गोष्ट प्रचलित लोकमताच्या दृष्टीने इष्ट अशीच होती या कालातील अत्रिसहिता आणि इतर स्मृतिग्रथानी देखील या स्मार्त धर्माचा पुरस्कार करून वैदिक यज्ञाच्या ऐवजी पच महायज्ञाला महत्त्व दिले होते राष्ट्रकूट चालुक्याची आज जी दानशासने उपलब्ध आहेत त्यावरून दान-घेणारे बहूतेक ब्राम्हण पच महायज्ञाचे उपासक होते असे आढळून येते या खेरीज या स्मार्त धर्माचे दुसरे वैशिष्टय म्हणजे व्रताचे आचरण आणि तीर्थ क्षेत्राचे महात्म्य हे होय पुराणानी व्रतवैकल्ये व वाराणसी इ तीर्थक्षेत्रे याचे वर्णन केले आहे वैदिक-धर्माच्या या अहिसाप्रधान स्मार्त आन्हिकाना या कालात जे विशेष महत्त्व देण्यात आले त्याचे कारण बौद्ध आणि जैन या धर्माबरोबर होणारी स्पर्धा हे होय असे तज्ज्ञाचे मत आहे दक्षि-णेत या कालविभागात कित्येक पौराणिक देवताची विशेषत शिव आणि विष्णु या देवताची जी प्रचड मदिरे उभारण्यात आली त्याचे कारण देखील हेच आहे या अवैदिक धर्मापैकी बौद्ध-धर्माला या कालापूर्वीच उतरती कळा लागून त्याचा या कालात ऱ्हास झाला परतु जैनधर्माला राजाश्रय मिळाल्यामुळे त्याचा बराच उत्कर्ष झाला कारण कर्नाटकातील गग आणि कदब राजे जैन होते तसेच मलखेडच्या राष्ट्रकूटापैकी काही जैनधर्मी होते तैलप या उत्तर चालुक्याने जेव्हा राष्ट्रकूटाचा पराभव केला तेव्हा इद्रराष्ट्रकूटाने जैनाच्या सल्लेखण विधीने आपला प्राण दिला जैनधर्माच्या या प्रसाराला तामिळप्रातात अळवार भक्ताच्या वैष्णवसाप्रदायाने आणि मलबारात नायनार साधूच्या शैवमताने बराच प्रतिबध केला तामीळप्रातातील चोलराजे कट्टर शैव अस-

त्यामुळे त्यानी देखील या कामी हातभार लावून जैनाचा फार छळ केला राजराजचोल याने मदुरा येथे प्रचड शिवमदिर बाधून त्या मदिरात नायनार शैव साधूच्या मूर्तीची स्थापना केली तामिळप्राताप्रमाणेच कर्नाटकात देखील कल्याणीच्या चालुक्याच्या सत्तेमुळे आणि म्हैसूरात होयसळाच्या धर्मांतरामुळे जैनधर्माची पिछेहाट झाली उत्तर चालुक्याचा पहिला राजा तैलप हा शैव होता म्हैसूरातील होयसळ आरभी जैनमताचे होते पण पुढे विष्णुवर्धनाने रामानुजाचार्याच्या उपदेशामुळे जैनधर्माचा त्याग करून वैष्णवमताचा पुरस्कार केला त्यामुळे जेनधर्माचा राजाश्रय सुटला परंतु कर्नाटकात या धर्माचा ऱ्हास लिगायत पथाच्या उत्कर्षामुळे झाला या पथाने जैन धर्माला असा जोराचा विरोध केला की, त्यानतर दक्षिणेत जैनधर्म बहुतेक नामशेष झाल्या-सारखाच झाला आध्रप्रातात वरगळचे काकतीय राजे शैव-मताचे होते सुप्रसिद्ध काकतीय राजा गणपतिदेव याच्या समोर तेलगु महाभारतकार तिक्कण्णा याने जैनाचा वादविवादात पराभव केला त्यामुळे आध्रप्रातातूनहि जैनधर्माचे उच्चाटन झाले याप्रमाणे तामिळ, कर्नाटक आणि तेलगण या तिन्ही प्रातात शैव वैष्णवानी जैनधर्माशी जो लढा दिला त्यात जैनाची पिछेहाट होऊन त्या धर्माचा ऱ्हास झाला दक्षिणेतील या धार्मिक आदोलनाचा महाराष्ट्रावर देखील परिणाम झाला असावा त्या कालातील ऐतिहासिक साधने या भागात कमी उपलब्ध झाल्यामुळे त्या परिणामाचे स्वरूप काय होते हे निश्चितपणे समजणे जरी कठीण असले तरीपण या धार्मिक लढयाचे स्वरूप तामिळ कर्नाटकाप्रमाणे तीव्र नसावे असे वाटते याचे कारण महाराष्ट्रावर यादवाच्या पूर्वी ज्या राजाची सत्ता होती ते बहुताशाने परमत-

सहिष्णु होते असे दिसते उदाहरणार्थ शातवाहन वाकाटक हे वैदिक धर्माचे अनुयायी आणि यज्ञयागाचे पुरस्कर्ते होते तरीपण बौद्ध-धर्मासबधी त्याचे धोरण उदार होते कारण निरनिराळ्या ठिकाणी जी बौद्धलेणी आज अस्तित्वात आहेत त्यापैकी बरीचशी या कालातच तयार झाली होती त्यानतरचे चालुक्य राष्ट्रकूट वैदिकधर्माप्रमाणेच जैनधर्माचे आश्रयदाते होते त्याच्या काला-तील दानशासनात कर्मठ ब्राम्हणाप्रमाणेच जैन यतीचा देखील समावेश झाला होता काही राष्ट्रकूट राजानी जैनधर्माचा जरी स्वीकार केला होता, तरीपण वैदिक धर्मानुयायाना त्यानी सम-तेने वागविले धार्मिक बाबतीत तामिळातील चोलाप्रमाणे त्याचे धोरण अनुदार नव्हते त्यामुळे महाराष्ट्रात धार्मिक लढ्याला फारसा वाव मिळाला नसावा दुसरे असे की, उत्तरेतून जैनधर्माचा प्रवेश प्रथमत दक्षिणेत तामिळ कर्नाटकात झाला आणि त्याच प्रातात त्यानी आपल्या धर्माचा प्रसार केला त्याच्या प्रसाराची केद्रे महाराष्ट्रात नसल्यामुळे त्या धर्माला येथे विरोधहि झाला नसावा जैनधर्माला या कालात जो जोराची टक्कर देण्यात आली ती वैदिकधर्माने दिली नाही, तर दक्षिणेतील शैव वैष्णव मतानी दिली याप्रमाणे महाराष्ट्र या धार्मिक लढ्यापासून थोडासा अलिप्त आणि दूर असा जरी होता, तरीपण पुढे नाथपथाच्या प्रसारामुळे जैनधर्माला या प्रातात बराच पायबद बसला असावा लीळा-चरित्र या उत्तरकालीन महानुभाव ग्रथात यासबधी सूचक उल्लेख आहेत अदडीनाथ सामर्थ्यकथन ही पूर्वार्धातील लीळा या दृष्टीने महत्त्वाची आहे त्या लीळेत अदडीनाथ नावाच्या नाथपथी योग्याने राजासमोर आधी वादात आणि मग अद्भुत सामर्थ्यात जैनराजगुरूचा पराभव करून वैदिकधर्माचा कसा पुनरुद्धार केला

या कथेचे वर्णन आलेले आहे त्यावरून महाराष्ट्रात जैनधर्माचा बराच प्रसार झाला होता असे दिसते लहान मुलाना वर्णमाला शिकविण्याचा प्रारभ करताना पहिले नमनाचे वाक्य ओनामासीध (ॐनम सिद्धम्) असे आहे ते जैनाचे आहे त्यावरून जैनयती शाळा घालून मुलाना साक्षर करीत असत आणि त्याबरोबर आपल्या धर्माचा प्रसार करण्याचे कार्यहि करीत असावेत असे वाटते यादवाच्या उत्तरकालात महानुभाव आणि वारकरी सप्रदायासारखे जे भक्तिमार्ग उदयास आले त्याच्या अनुयायानी जैनधर्मासबधी प्रतिकूलच उद्गार काढले आहेत भास्करभट्ट महानुभाव आपल्या शिशुपालवध या गथात वैदिकधर्म हा राजमार्गासारखा सरळ आहे पण जैनधर्म हा आडवाटेप्रमाणे त्रासदायक आणि धोक्याचा आहे असे आपले मत देतो तसेच ज्ञानेश्वर आपल्या ज्ञानेश्वरीत "पाखाडाचे कडे। नागवी लुचिती मुडे। नियोजिली वितडे। तळासी येती" असे जैनधर्माला अनुलक्षून त्याच्या अनुयायाच्या धार्मिक कृत्याचा धिक्कार करतात यावरून या सतामहताना देखील जैनधर्माची वेदबाह्यमते नास्तिकपणाची अतएव त्याज्य वाटत होती असे म्हणण्यास हरकत नाही

परतु यादवाचे या धर्मासबधी उदार धोरण होते नतरचे यादवराजे स्वत ला वैदिकधर्माचे अनुयायी म्हणवीत असले तरीपण ज्याने सेउण यादवकुळाची स्थापना केली त्या दृढप्रहाराची आई जैनयती चदप्रभास्वामी याच्या कुतीविहार आश्रमात आश्रयासाठी उत्तरेतून आली होती आणि तेथेच तिला मुलगा झाला अशी एक दतकथा नासिक्यपुर कल्पात दिली आहे या कथेला ऐतिहासिक पुरावा नसल्यामुळे ती निव्वळ दतकथाच असावी तरीपण या कथेवरून आरभी आरभी सेऊण यादव-

कुलाचा जैनधर्माशी सबध होता असे दिसते या नतरच्या सेऊण यादवानी जैनधर्माबद्दल सहानुभूतीच दाखविली आहे सेउणदेव या यादवराजाने जैनधर्माला राजाश्रय दिला होता असे अजनेरी-च्या शिलालेखावरून दिसते कारण या लेखात आरभीचे नमन जैनपद्धतीचे आहे तसेच या लेखात चद्रप्रभा या जैनदेवाला दोन दुकाने करमाफ करून दान केल्याबद्दलचा उल्लेख आहे यानतरचे यादव जरी वैदिकधर्माचे पुरस्कर्ते होते तरीपण जैनधर्माबद्दल उदार धोरणच त्यानी स्वीकारले होते उदाहरणार्थ कृष्णयादवाची वैदिक-धर्माच्या अभिमानाबद्दल फार प्रसिद्धी आहे त्याने अनेक यज्ञ केले ममदापुरच्या लेखात या कृष्णयादवाने वैदिकधर्माचे पुनरुज्जीवन केले असे स्पष्ट म्हटले आहे हेमाद्रि देखील आपल्या ग्रथात "क्षीण कालवशात् पुनस्तरुणता धर्मोऽपि सप्रापितः असे त्याच्यासबधी प्रशासापर उद्गार काढतो याच कन्हरदेवाच्या राजवटीत त्याच्या राणीच्या आज्ञेने सर्वाधिकारी माईदेव याने एक जैन बस्ती बाधल्याचा उल्लेख आहे कर्नाटकात त्याकाली कडकोल आणि मुनिवल्ले ही जैनधर्माची केद्रे होती सन १२५१ या वर्षी कृष्ण-देवाच्या कारकीर्दीत काळुकेरे येथील महाजनानी अनततीर्थ देवाच्या बस्तीसाठी जमीन इनाम दिली होती

जैनधर्माच्या बाबतीतले यादवाचे हे उदारधोरण त्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या धर्मासबधीहि दिसून येते त्याचे कित्येक महाप्रधान धर्माने जैन होते महाप्रधान मल्ल आणि बाच हे जैन-धर्मी असून त्यानी सन १२४४ या वर्षी सिघणाच्या राजवटीत अनत तीर्थंकराची एक बस्ती बाधली तसेच रामदेवाचा महा-प्रधान टिप्परस हा कर्नाटकात सुभेदार असताना बोप्पण याने सन १२६९ या वर्षी एक जैन बस्ती बाधली रामदेवाचे माडलिक

कुचिराज आणि चट्ट हे बधु जैन असून पद्मसेनाचे भक्त होते. रामदेवाचा दुसरा एक महामडलेश्वर भैरव देवरस हा स्वत जैनधर्मी असून वैदिकधर्माचा पुरस्कर्ता होता हे विशेष आहे जैनधर्माप्रमाणेच जैनकवीना देखील यादवाचा आश्रय असे शातीश्वर पुराणाचा कर्ता कमलभव हा अशापकीच होता

दानशासनातील वरील उल्लेखावरून एक गोष्ट लक्षात येते. ती ही की, ही दानशासने कर्नाटकातील असून यादव अधिकारीही नावावरून कानडीच दिसतात कर्नाटकात यादवाच्या कालापूर्वीपासून जैनधर्माचा प्रसार झाला होता ही गोष्ट प्रसिद्ध आहे परतु महाराष्ट्रात दान घेणारे जैनयती ज्या अर्थी सापडत नाहीत त्या अर्थी जैनधर्माला नतरच्या अमदानीत नाथसप्रदायामुळे उत्तरती कळा लागली असावी

शातवाहनानतर दक्षिणेत बौद्ध धर्माचा ऱ्हास झाला हे वर सागितलेच आहे याचे कारण कुमारील भट्ट आणि शकराचार्य यानी त्या धर्मावर चढविलेले हल्ले हे होय असे के वैद्य याचे मत आहे परतु महाराष्ट्रात त्याचे अस्तित्त्व कुठे कुठे जाणवत होते लीळाचरित्रात बुद्ध विहाराचा उल्लेख आला आहे वैदिकधर्मानुयायाना विशेषत ब्राम्हणाना बुद्धविहार वर्ज्य होता परतु गौतमबुद्धाची अवतारात गणना याकालात झाली होती

हेमाद्रीच्या व्रतखडात देवगिरीचे यादव हे भगवान कृष्णाचे वशज असून आरभी द्वारकेचे राजे होते असा उल्लेख आहे या उल्लेखाला यादवाच्या दानशासनावरून आधार मिळतो या शासनात त्यानी यादवनारायण, यदुकुळतिलक, आणि द्वारावतीपुरवराधीश्वर अशी विरुदे धारण केलेली आहेत यावरून ते कृष्णाचे उपासक अथवा भागवत साप्रदायी असावेत अशी सहज

कल्पना होते आणि ही कल्पना नतरच्या यादवाच्या लेखावरून खरी होती असे स्पष्ट दिसते उदाहरणार्थ खेद्रापुर येथील १२२४ च्या लेखात सिघण याने वैष्णव मताला राजाश्रय देऊन आपल्या अत करणात हरीची स्थापना केली असा उल्लेख आहे तसेच ममदापुरच्या लेखात शारगपाणीच्या पदकमलाची पूजा केल्यामुळे सिघणाला सिहासन मिळाले असे म्हटले आहे त्याचा नातू कृष्ण हा तर वासुदेवाचा पूर्ण भक्त होता हे बागेवाडीच्या लेखावरून स्पष्ट होते शेवटचा वैभवशाली राजा रामदेव याने पढरपुरच्या विठ्ठल मदिराला मोठी देणगी देऊन त्याचा कसा पुनरुद्धार केला ही गोष्ट तर चौऱ्याशीच्या लेखावरून प्रसिद्धच आहे वस्तुत पढरपुर हे क्षेत्र बरेच प्राचीन आहे देवगिरीच्या यादवाच्या पूर्वी होयसळ यादवाच्या अधिकारात हे क्षेत्र होते या होयसळापैकी वीर सोमेश्वर याने शके ११५९ या वर्षी विठोबाच्या पूजेसाठी दाने केल्याचे वर्णन विठ्ठल मदिरातील एका जुन्या शिलालेखात आहे यावरून होयसळ आणि देवगिरी या दोन्ही राजघराण्याचा या मदिराला राजश्रय होता हे उघड दिसते.

याप्रमाणे सेऊण यादव हे जरी विष्णूचे उपासक होते तरी पण शिवाची ते भक्ति करीत नव्हते असे नाही इतकेच नव्हेतर काही सशोधकाच्या मते अकराव्या शतकातील सेऊण यादव हे शिवोपासक होते उदाहरणार्थ कळसबुद्रुक येथील १०२५ च्या लेखात तिसऱ्या भिल्लमाने शभूची पूजा केली असा उल्लेख आहे तसेच सेऊणचद्र दुसरा हा धर्माने शैव होता त्याने शकराच्या मदिराला स्वत च्या इष्टेटीतून इनाम दिले होते परतु हा शैवपंथ पाशुपत असावा कारण या राजाचा गुरु सर्वदेवाचार्य हा पाशुपत साप्रदायी होता पाचव्या भिल्लमाचा देखील कालामुख शैव

पथाला आश्रय होता असे दिसते कारण सन ११९१ यावर्षी वीर बल्लाळ होयसळाच्या विरुद्ध लढत असताना त्याने एक गाव सिद्धातचद्रभूषण पडित या स्थानकाचार्याला इनाम दिला होता हा आचार्य कालामुख शैव होता या शैवपथाप्रमाणेच बसवाच्या वीरशैवपथाला आणि त्या पथातील जगमाचा यादवानी परामर्श घेतला होता या पथाच्या अनुभवशिखामणी या ग्रथात एक कथा दिली आहे त्या कथेत पाचवा भिल्लम हा वीरशैव होता असे म्हटले आहे परतु या कथेला दुसरा पुरावा नसल्यामुळे ही दतकथाच असावी यावरून देवगिरीच्या यादवाचा लिगायत पथाला आश्रय नव्हता असे म्हणता येणार नाही कृष्ण यादवाची वासुदेवावर किती भक्ति होती हे वर सागितलेच आहे त्याच-कृष्णाने बसवाच्या वशातील हाल बसवीदेव या वीरशैव साधूला जगमाना भोजन घालण्यासाठी एक गाव दान केला होता असा उल्लेख शके११८२ मधील अर्जुनवाडा ताम्रपटात आहे यादवाचे काही प्रधान आणि सेनापति वीरशैव होते महाप्रधान देवराज हा महादेव यादवाचा सुभेदार लिगायतपथी होता त्याने सोला-पुराला भेट देऊन कपिलसिद्धमल्लिकार्जुनाचे दर्शन घेतले आणि त्या देवाच्या पूजेसाठी एक गाव इनाम दिला रामदेवाचा चाउडरस नावाचा एक सेनापति धर्माने वीरशैव होता तो मेला तेव्हा त्याला लिगायत पथाच्या आचारपद्धतीने पुरण्यात आले

यावरून यादवराजे स्वत वैदिकधर्माचे पुरस्कर्ते आणि कृष्णाचे भक्त असूनहि बसवाच्या वीरशैव मताला त्याचा उदार आश्रय होता हे स्पष्ट दिसते विशेषत या पथाला वैदिकधर्माचे प्रमुख अग चातुर्वर्ण्य आणि इतर आचार विचार मान्य नाहीत एका शिवाखेरीज इतर देवताची ते उपासना करीत नाहीत.

आणि दुसरे असे की, बिज्जल कलचुरीच्या कारकीर्दीत या पथाची जरी स्थापना झाली होती तरी पण तो एक सुधारक अतएव बडखोर धार्मिक पथ म्हणूनच त्याची प्रसिद्धि झाली त्यामुळे पथ सस्थापक बसव आणि बिज्जल याचा बेबनाव होऊन त्याचे पर्यवसान दोघाच्या मृत्यूत झाले ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे अशा सुधारक पथाचा काही कालानतर कृष्णासारख्या वैदिक धर्मानुयायी राजाने परामर्श घ्यावा ही गोष्ट उदारपणाची आहे असे वाटते की, या पथाला नतर समाजात विरोध कमी होऊन प्रतिष्ठा लाभली असेल जगमाच्या निस्पृह राहणीमुळे आणि पवित्र आचरणामुळे इतर साधुसत्पुरुषाप्रमाणे सामाजात त्याना मान्यता मिळन असेल स्थापनेनतर काही कालाने या पथाला प्रतिष्ठा लाभली असावी आणि त्यामुळेच या पथातील साधूची राजापर्यंत पोच झाली

यादवाचे राज्य महाराष्ट्राप्रमाणे कर्नाटकावरहि होते परतु वीरशैवपथाचा प्रसार कर्नाटकात जसा होता तसा महाराष्ट्रात नव्हता ही गोष्ट दानशासने आणि समकालीन वाङमय यावरून स्पष्ट होते ज्या कालात जैन, वैष्णव आणि वीरशैव महत आपापल्या मताचा प्रचार कर्नाटकात करीत होते त्या कालात महाराष्ट्रात वैदिकधर्मच प्रामुख्याने नादत होता परतु या वैदिक धर्माला स्मार्त पौराणिक धर्माचे स्वरूप यापूर्वीच प्राप्त झाले होते हे वर सागितलेच आहे याचा परिणाम असा झाला की, मूर्ति-पूजा, व्रत वैकल्ये आणि तीर्थ क्षेत्रे याना फार महत्व प्राप्त झाले हेमाद्रीचा चतुर्वर्गचितामणि हा ग्रथ या स्वरूपाची माहिती देणारा असा प्रसिद्ध धर्मशास्त्रावरील निबध याच यादवाच्या कालात रचण्यात आला या ग्रथाच्या व्रतखड, दानखड, आणि

तीर्थखंड या भागावरून समकालीन धर्माच्या आचार विचारांची बरीच कल्पना करता येते महानुभावांच्या लीळाचरित्र या ग्रंथातील उल्लेखावरून देखील यादव कालीन बहुजनसमाज धर्माच्या बाबतीत बराच अंधश्रद्ध, धर्मभोळा आणि परंपरेचा अभिमानी होता पंथ प्रवर्तक चक्रधर स्वामी आपल्या भ्रमणात ज्या ज्या गावी जात तेथे तेथे देवालये आणि मठ यांचा भरणा असे ह्या देवदेवताच्या उपासकात शिव आणि विष्णु यांच्या भक्तांची संख्या अर्थात जास्त होती परळीचा वैद्यनाथ आणि औंढ्याचा नागनाथ आता प्रमाणे त्याकाळीहि प्रसिद्ध होते परंतु वेरूळच्या घृष्णेश्वराचा उल्लेख लीळाचरित्रात आढळत नाही. त्या ऐवजी माणकेश्वराची प्रसिद्धि बरीच होती हा माणकेश्वर म्हणजे सुप्रसिद्ध कैलास लेण्यातील शिवलिंग असावे या खेरीज पैठण जवळील आपेगाव येथील विज्ञानेश्वराचे महात्म्य बरेच होते तत्कालीन उल्लेखावरून महाराष्ट्रात शिवोपासना जास्त प्रचारात होती असे दिसते शिवाप्रमाणे विष्णूचे उपासकहि बरेच होते द्वारकेचे माहात्म्य त्याकाली फार होते त्याखेरीज महाराष्ट्रात लोणार येथील शारंगधर, आणि पैठणाचा भोगनारायण याचीही प्रसिद्धि होती आज महाराष्ट्रात सूर्योपासना फारशी प्रचारात नाही सूर्य मंदिरे तर कुठेच नाहींत परंतु यादवकाळी सूर्याची मंदिरे अनेक ठिकाणी होती अहमदनगर जवळ भिंगार या गावी आणि राक्षसभुवन जवळ विझुगा ( विचका ) येथे सूर्य मंदिरे होती सूर्याप्रमाणे परशुरामाचीहि मंदिरे होती. आणि दर आदितवारी त्या देवतेंची यात्रा भरत असे नासिक पंचवटी येथील राम आणि नागपुर जवळ रामटेकचा भोगराराम याचीहि प्रसिद्धि होती मातापुर (माहूर) आणि पंचाळेश्वर ही दत्तात्रय

प्रभूची पवित्र स्थाने होती देवाप्रमाणे देवीच्या उपासकांचा बराच भरणा होता रेणुका, महालक्ष्मी, म्हाळसा, महाकाळी, कोळाई इत्यादि नावे आणि त्यांची मंदिरे त्याकाळी प्रसिद्ध होती तीर्थ-क्षेत्रात काशीचे महात्म्य फार होते यात्रेकरू मोठ्या जमावाने काशी, प्रयाग, द्वारका इत्यादि क्षेत्रांची यात्रा करण्यास निघत आणि काशीची भागीरथी कुपीत भरून आणीत मोठमोठ्या देवस्थानांना राजेलोक देणग्या वर्षासने देऊन त्यांचे वैभव वाढवीत असत महाराष्ट्रात आज गोव्याखेरीज इतर भागात देवदासींची चाल आढळत नाही परंतु त्याकाळी देवापुढे नर्तिकांचे नृत्य गायन होई

तीर्थ क्षेत्राप्रमाणे व्रतवैकल्यांना देखील त्याकाळी लोकप्रियता लाभली होती निरनिराळ्या व्रतांचे आचरण हे पौराणिक धर्माचे वैशिष्ट्यच आहे शंकरभट्टाच्या व्रतार्कात वर्णिलेल्या ११३ व्रता-पैकी ११० व्रते पुराणावर आधारलेली आहेत तोच प्रकार व्रत कौमुदीतील १२८ व्रतांचा आहे ही व्रते पुराणातूनच घेतली आहेत हेमाद्रीने देखील व्रतखंडात दिलेल्या व्रतांना पुराणांचा आधार घेतला आहे आजहि त्यापैकी काही व्रते शहरे व खेड्या पाड्यातून आचरणात येतात उदाहरणार्थ अनंतव्रत, एकादशी, गोकुळअष्टमी नागपंचमी, गणेशचतुर्थी नवरात्र इत्यादि व्रतांचे उपासक आजहि आहेत व्रतांचे आचरण केल्याने इच्छित कामना तृप्त होतात, अशी सामान्य लोकांची श्रद्धा असते परंतु यादव-काळी यापेक्षा किती तरी व्रते आचरणात होती त्यापैकी मासो-पवास हे स्त्रियांचे व्रत आज प्रचारात नाही तसेच चांद्रायणव्रत, पंचाग्निसाधन इ. व्रते आज कोणी आचरित असल्याचे माहीत नाही.

यादवकालीन या धार्मिक आचारविचाराच्या बाबतीत प्रो श वा दाडेकर यानी आपले जे मत दिले आहे तें विचार करण्यासारखे आहे ते म्हणतात "व्रते, उद्यापने, नियम, मत्रतत्र जडीबूटी, तीर्थयात्रा, नागनरसोबा, बहिरोबा, देवीदैवते, भुतेखेते इत्यादीच्या पूजा प्रकाराचा सुकाळ झाला होता मुख्य वैदिक धर्माला लोक विसरले होते लोकाची दृष्टि धर्माच्या बाह्यागावर खिळली होती" डॉ श दा पेडशे यानी देखील या कालासबधी अशाच प्रकारचे मत दिले आहे अशा धर्मभोळया समाजात योगी, महात्मे आणि साधुसत याना प्रसिद्धि लवकर मिळते कारण त्याचे निस्पृह आचरण आणि अद्‌भुत चमत्कार यामुळे लोक त्याच्या भजनी लागतात आणि दुसरे असे की, धर्माच्या या विधि निषेधाच्या बाह्यागापेक्षा त्याच्या उपदेशाचा भर अत करण शुद्धी-वर असल्यामुळे तो लोकाना लवकर पटतो ते मोक्षप्राप्तीकरिता भक्तिसारखा सोपा उपाय सागतात त्यामुळे बहुजन समाजातून त्याना अनुयायी फार मिळतात आणि मग ह्यातून महानुभाव वारकरी साप्रदायासारखे धर्मपथ निर्माण होतात चक्रधरस्वामीना एका शिष्याने "व्रत केल्याने काय होते" असा प्रश्न केला त्याला स्वामीनी जे उत्तर दिले ते असे "आत्मा पीडे, पाप होय, नकीजे पाप ना पुण्य एकादशीमुळे जीव पळभरी मास भक्षण करी पाप होय" व्रत केल्याने जर पाप होते तर करा कशाला? अशा प्रकारचा उपदेश कुणालाहि पटण्यासारखा आहे या कालात योगी महात्मे जागजागी आढळून येत असत लीळाचरित्रात अशा अनेक साधूच्या कथा दिलेल्या आहेत हे साधू महात्मे समाजात आपल्या मताचा उपदेश करीत असत त्यापैकी नाथपथी योग्याचा भर हटयोग आणि अद्‌भुत चमत्कार यावर असल्यामुळे त्याची प्रसिद्धि

फार होती दहाव्या अकराव्या शतकापासून या पथाचा प्रसार झाला होता गोरखनाथ या प्रसिद्ध योग्याची माहिती चक्रधराच्या काळी महाराष्ट्रात आबालवृद्धाना होती स्वत चक्रधरस्वामी गोरखनाथाचा उल्लेख आदराने करतात एखादा सत्पुरुष भेटल्यास भाविक लोक हा साक्षात् गोरखनाथ असे म्हणत असत. यावरून गोरखनाथ रामदेव यादवाच्या काळापूर्वी बरीच वर्षे आधी होऊन गेला असावा गोरक्ष फोकरणे म्हणजे गोरखनाथाचे नाव घेऊन भीक मागणे ही म्हण त्यावेळी भिक्षेकऱ्यात प्रसिद्ध होती हे नाथपथी महात्मे लोकाना अद्भुत चमत्कार दाखवून आपला सप्रदाय वाढवीत असत. जालधरनाथ, अदडीनाथ, कुडराम इत्यादि योग्याच्या कथा लीळाचरित्रात आलेल्या आहेत विश्वनाथ नावाच्या नाथपथी महात्म्याने चक्रधराना पाहून "पिवळी दाडी करू जाणे' म्हणजे ताब्याचे सोने तयार करता येते का? असा प्रश्न केला त्याला चक्रधरानी नकारार्थी उत्तर दिले यावरून या किमयेची प्रसिद्धि त्याकाळी देखील सर्वत्र होती असे दिसते हे नाथपथी योगी फिरस्ते असून भिक्षा वृत्तीने राहत त्यामुळे बहुजन समाजाशी याचा सबध नेहमी येत असे या पथाचा उदय कोणत्या शतकात आणि कोणत्या भागात झाला यासबधीची निश्चित माहिती उपलब्ध नाही मत्स्येद्रनाथाचा उल्लेख अभिनवगुप्ताच्या तत्रावलोकात आढळतो यावरून तो योगी नवव्या किवा दहाव्या शतकात होऊन गेला असावा महाराष्ट्राप्रमाणे तामीळ, तेलगी आणि कानडी या प्रदेशातहि नाथपथाची प्रसिद्धि होती गौरण्णा नावाच्या एका तेलगु कवीने चौदाव्या शकतात नवनाथ चरित्र रचिले त्यात गोरखनाथाचा उल्लेख आहे हे नाथपथी योगी चातुर्वर्णी भिक्षा करीत असत

यावरून जातिभेदाचे बधन या पथात नव्हते असे दिसते चक्रधर शिष्या आऊसा ही बाई नाथपथी असल्यामुळे ती अशा प्रकारे भिक्षा मागत असे भिक्षा मागताना हे योगीलोक "नित्य चल-चित। मदमद मनसो। परमानद परमानद। मन भुलीरे। अशा प्रकारची अध्यात्मपर हिंदी पदे म्हणत आबैसा या चक्रधर शिष्यी-णीने एक चौपदी गाइली तेव्हा चक्रधरानी 'हे नाथवाणी सिद्धवाणी ते निकी' असे प्रशसापर उद्‌गार काढले यावरून नाथसप्रदाय हा उत्तरेकडून महाराष्ट्रात आलेला आहे या कै वि ल भावे याच्या मतात बरेच तथ्य दिसते मराठीचे आदि कवि मुकुदराज आणि सत शिरोमणी ज्ञानेश्वर महाराज हे नाथ साप्रदायी होते ही गोष्ट प्रसिद्धच आहे परतु याची गुरुपरपरा एक नव्हती हा पथ आदि-नाथ अथवा शकराला आपले आद्य दैवत मानीत असला तरी पण शिव आणि विष्णु यामध्ये भेद मानणारा नव्हता याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे स्वत ज्ञानेश्वराचे कार्य आणि त्याचे तत्वज्ञान हे होय त्यानी आपल्या ज्ञानेश्वरीत शकराला महाविष्णु या नावाने सबोधिले आहे यातच या अभेदाचे बीज आहे ज्ञानेश्वरा-च्या पूर्वी दक्षिणेत शैव आणि वैष्णव याच्या मधील भेद आणि द्वेषभाव विकोपाला गेले होते परतु रामानुज मध्वासारखे थोर आचार्य अथवा बसवासारखे वीरशैव धर्मसुधारक याच्या मताचा परिणाम महाराष्ट्राच्या धार्मिक जीवनावर झाला नाही याचे बरेच श्रेय ज्ञानेश्वराच्या शिकवणीला देणे योग्य होईल वस्तुत वारकरी पथात भक्तीला प्रमुख स्थान असल्यामुळे अद्वैतापेक्षा द्वैताला हा सप्रदाय जवळचा असावा आणि तसा प्रकार सम-कालीन इतर पथात आहे उदाहरणार्थ महानुभाव पथात द्वैत-मताचा पुरस्कार केला आहे दक्षिणेतील आळवार आणि नाय-

नार भक्त आणि त्यानंतर होऊन गेलेले रामानुज मध्वासारखे विष्णुभक्तीचा प्रचार करणारे थोर आचार्य अद्वैती नव्हते बसवाचा वीरशैव पंथ हा अद्वैतापेक्षा विशिष्टाद्वैताकडेच जास्त झुकला आहे असे असताना शंकराचार्यांचे ज्ञानप्रधान अद्वैत आणि भागवत धर्माची इतर आचार्यांनी पुरस्कारलेली भक्ति याचा गोड समन्वय महाराष्ट्रातच फक्त वारकरी पंथासारख्या विठ्ठलाच्या भक्तिमार्गात का सापडतो ही गोष्ट विचार करण्यासारखी आहे ज्ञानेश्वरीत विठ्ठलाचे नाव नाही, ज्ञानेश्वरांनी आपल्या तत्त्वज्ञानात शांकरमताचा पुरस्कार केला आहे, ते एक थोर नाथपंथी योगी होते इत्यादि गोष्टी खऱ्या आहेत परंतु नामदेवादि समकालीन विठ्ठलभक्तांनी आपल्या भक्तीचे नाते जवळच्या रामानुज मताशी न जोडता जरा दूर असलेल्या ज्ञानेश्वराच्या शांकर अद्वैताशी का जोडावे ही गोष्ट देखील विचार करण्यासारखी नाही का ? दुसरे असे की, पंढरपुरातील विठ्ठलाच्या मंदिराला देवगिरीच्या यादवापूर्वी म्हैसूरच्या होयसळाचा आश्रय होता हे वर सांगितलेच आहे ह्या होयसळांपैकी विष्णुवर्धन अथवा बिट्टीदेव हा रामानुजाचा शिष्य होता त्याच्या नावाशी विठ्ठलाचा संबंध असो वा नसो, तो वादग्रस्त प्रश्न जरी सोडून दिला तरीपण महाराष्ट्राप्रमाणे कर्नाटक तेलंगणात यादवकाली पंढरपुर हे क्षेत्र प्रसिद्ध असून त्या प्रांतातून भक्तांचे समुदाय विठ्ठलाच्या दर्शनाला येत असत ही गोष्ट विठ्ठल मंदिरातील शके ११९८ च्या चौऱ्याशीच्या लेखातील नावांवरून सहज समजण्यासारखी आहे आणि कर्नाटकात तर यावेळी रामानुज आणि नंतर मध्वाचार्य यांच्या मताचा प्रभाव जास्त होता आपले भक्तहि कानडा विठ्ठलु कर्नाटकु असे आपले मत देतात इतकेच

नव्हे तर विठ्ठलाचा प्राचीन भक्त पुंडलिक हाहि कानडीच असावा असे काही लोकांचे म्हणणे आहे ज्या विठ्ठलाचे वर्णन करताना आपले मत 'विष्णु सहित शिव आणिला पंढरी'। असे वर्णन करून त्या दोघांची अभेद भक्ति दर्शवितात त्याच विठ्ठलाचे तेराव्या शतकातील कानडी कवि चौंडरस याने आपल्या अभिनव दशकुमार चरित्रात जे वर्णन केले आहे ते जरा निराळ्या स्वरूपाचे आहे आपल्या मताप्रमाणे विठ्ठलाच्या मस्तकावर शिवलिंग नसून तो मुकुट आहे असे चौंडरसाचे मत आहे तेव्हा आपल्या नामदेवादि प्रमुख विठ्ठलभक्तांनी आपल्या भक्ति मार्गाला जरा जवळचे असे कर्नाटकातील भक्तिप्रधान रामानुज मत सोडून नाथपंथी ज्ञानेश्वराच्या शैवमताची का जोड दिली? त्याकाली अमका सत्पुरुष अथवा आचार्य द्राविड प्रांतातील म्हणून त्याचे मत त्याज्य आणि अमका मराठी म्हणून त्याचे मत ग्राह्य असा धर्माच्या बाबतीत भेदभाव नव्हता असे जर आहे, तर मग महाराष्ट्रातील लोकप्रिय वारकरी सांप्रदायात हा जो अद्वैत भक्तीचा समन्वय दिसतो त्याचे श्रेय ज्ञानेश्वरांना देणे योग्य होणार नाही का? कोणत्याहि प्राचीन धर्मपंथाचा, मग तो भक्ति मार्ग का असेना आपण जर इतिहास पाहिला तर आपल्याला बऱ्याच प्रमाणात त्या पंथाच्या मागे एखादे तत्त्वज्ञान दिसते तसा प्रकार वारकरी पंथातहि आहे तो म्हणजे ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाची बैठक हा होय ज्ञानेश्वरीला वारकरी पंथात 'आई' या नावाने संबोधितले जाते स्वतः ज्ञानेश्वर गुरुपदेशाच्या नात्याने नाथसंप्रदायी असले तरी पण वडील विठ्ठलपंत हे पांडुरंगाचे भक्त होते अशी आख्यायिका आहे, त्यामुळे त्यांच्या मतात असा सुंदर समन्वय झाला असावा दुसरे असे की, यादवकालीन महा-

राष्ट्राची धार्मिक परिस्थिती ही या गोष्टीला कारणीभूत झाली असावी तत्कालीन समाजात शंकराचार्यांच्या अद्वैत मताखेरीज दुसऱ्या कोणत्याहि आचार्यांचे नावहि ऐकू येत नाही मध्वाचार्य हे समकालीन असल्यामुळे त्यांच्या द्वैतमताचा महाराष्ट्रात प्रभाव पडला नसेल परन्तु रामानुजाचार्य ज्ञानेश्वरापूर्वी सुमारे दीडशे वर्षे आधी होऊन गेले असल्यामुळे त्यांच्या भक्तिप्रधान विशिष्टाद्वैत मताचा परिणाम महाराष्ट्रावर होणे संभवनीय होते परंतु तसा तो ज्ञानेश्वराच्या तत्वज्ञानावर झाला नाही आणि तत्कालीन समाजात तर त्यांच्या नावाचा उल्लेखहि सापडत नाही डॉ श दा पेंडशे यांनी आपल्या ज्ञानेश्वराचे तत्त्वज्ञान या ग्रंथातील 'भाष्यकाराते वाट पुसतु' या प्रकरणात रामानुजाच्या अनुसरणाचे ज्ञानेश्वरीत एकच निरपवाद स्थळ आढळते व ते "यावानर्थ उदपाने सर्वत संप्लुतोदिके" हा श्लोक होय असे आपले मत दिले आहे बाकी सर्व ठिकाणी शंकराचार्यांचेच अनुकरण त्यांनी केलें असेहि ते म्हणतात लीळा चरित्रावरून तत्कालीन समाजाच्या धार्मिक स्थितीचा बराच बोध होतो त्या समाजात वावणारे पंडित, सन्याशी, महात्मे शंकराचार्यांच्या नावाचा उल्लेख आणि त्यांच्या अद्वैत मताचा पुरस्कार करणारे आढळून येतात श्री चक्रधर हे द्वैताचे पुरस्कर्ते असल्यामुळे कधी कधी आपल्या भक्तासमोर अद्वैताची थट्टा करतात परंतु रामानुजाच्या मताचा उल्लेख कुठेहि आढळून येत नाही इतकेच नव्हे तर तेव्हापासून आतापर्यंत महाराष्ट्रात रामानुजाचा एकहि भक्त झाला नाही हे या भागातील वैशिष्टय विचार करण्यासारखे आहे महाराष्ट्रात रामानुज सप्रदायी मुळीच आढळून येत नाहीत याचे कारण राजकीय स्वरूपाचे आहे ते म्हणजे देवगिरीचे यादव आणि

होयसळ यादव याचे हाडवैर हे होते असे आमचे एक कानडीचे प्राध्यापक मित्र सागातात धर्माशी राजकीय वैराचा कितपत सबध आहे हे सागणे जरा कठीण आहे तरी पण रामानुजाच्या मताचा आमच्या धार्मिक जीवनावर मुळीच परिणाम झाला नाही ही गोष्ट खरी आहे

ज्ञानेश्वराच्या तत्त्वज्ञानावरील ग्रथात विठ्ठलाचे नाव आढळत नाही याचे कारण या ग्रथाची रचना झाल्यावर मग ज्ञानेश्वर विठ्ठलाचे भक्त झाले, अभगाची रचना त्यामुळे मागाहून झाली असे काही विद्वानाचे मत आहे ते खरेहि असेल कारण शके ११९८ च्या शिलालेखावरून भक्तानी रामदेवाच्या सहाय्याने ठि्ठलमदिराचा पुनरुद्वार केला मदिराप्रमाणेच पाडुरगाच्या जीर्ण झालेल्या भक्तीचाहि त्यानतर उद्धार होऊन महाराष्ट्रात तिचा जास्त प्रसार झाला असावा अशा प्रकारे साहाय्य करून रामदेवाने पाडुरगासबधीची आपली निष्ठा व्यक्त केली त्याप्रमाणे विठ्ठलाच्या वारकरी सप्रदायाला रामदेवाचा आश्रय होता काय? ज्ञानेश्वरानी आपल्या ज्ञानेश्वरीत "तेथ यदुवश विलासु। सकल कला निवासु। न्यायाते पोषी क्षितीशु।। असा रामदेवाचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे यावरून रामदेव यादवाची ज्ञानेश्वराच्या कार्यासबधी सहानुभूति होती असे दिसते एरव्ही ज्ञानेश्वरासारखे निस्पृह योगी खोटी स्तुति करणार नाहीत परतु यादवाच्या दानशासनात एकाहि नाथपथी योग्याचा किवा वारकरी सताचा उल्लेख नाही ज्या यादवानी जैनासारख्या अवैदिक पथाचा परामर्श घेतला अथवा वीरशैवासारख्या सुधारक मताला आश्रय देऊन आपली उदार बुद्धि दाखविली त्याच यादवानी महाराष्ट्रात धर्मजाग्रतीचे कार्य करणाऱ्या पथाचा परामर्श घेऊ नये ही गोष्ट

विचार करण्यासारखी आहे महादेव यादवाच्या राजवटीतील एका लेखात (सन १२६५) एका योगी चक्रवर्ती प्रकाशप्रभूचा उल्लेख आहे परतु तो नाथपथी असावा किवा नाही याची शका आहे कदाचित् हे नाथपथी महात्मे निस्पृहवृत्तीचे फिरस्ते लोक असल्यामुळे त्यानी राजाश्रयाची पर्वा केला नसावी दुसरे असे की, यादवाचे धोरण पुढेपुढे वर्णाश्रम धर्मातील कर्मठपणाला जास्त पोषक झाल्याचे दिसते याला कारण यादवाच्या दरबारी हेमाद्रिसारख्या धर्मशास्त्रकाराचे वजन हे होय तसे पाहिले तर सिघणापासून किवा त्यापूर्वीहि यादवाच्या अधिकारी आणि आश्रितवर्गात ब्राम्हण पडिताचे वर्चस्व महाराष्ट्रात जास्त होते सिघणाचा सेनापति खोलेश्वर हा ब्राम्हण होता तसेच त्याचा श्री करणाधीप सोधल हा काश्मिरी पडित होता त्याचीच जागा पुढे त्याचा मुलगा शारगधर याला मिळाली सुप्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य याचा मुलगा लक्ष्मीधर हा जैतुगीचा दरबारी पडित होता महादेव रामदेव काली हेमाद्रि आणि बोपदेव हे गुरु शुक्रासारखे तेजस्वी तारे प्रसिद्धच आहेत या पडिताच्या अधिकाराचा यादवाच्या धर्मविषयक धोरणावर परिणाम झाला असला पाहिजे महादेव रामदेवाचे जे लेख उपलब्ध आहेत, त्यावरून ठिकठिकाणी वैदिक ब्राम्हणाना अग्रहारे देऊन त्याचा परामर्श घेण्यात येत होता असे स्पष्ट दिसते पैठण, पुरुषोत्तमपुरी, ठाणे इत्यादि स्थळी उपलब्ध झालेली यादवशासने या दृष्टीने महत्त्वाची आहेत ही अग्रहारे किवा देणग्या देताना यादवराजे काही नियम घालीत असत त्यामध्ये सर्व लोकानी वर्णाश्रम धर्माप्रमाणे चालावे अशी त्याची सक्त आज्ञा असे तसेच ब्राम्हणानी सन्मार्गाने चालून आपल्या गावात वेश्याना जागा देऊ नये आणि जुगार खेळू नये

असा त्याचा नियम असे (पण्यागनाना सदन न देय। द्यूत प्रचारोऽपि निवारणीय ) धर्माच्या बाबतीतील यादवाचे हे धोरण महादेव रामदेवाच्या कारकीर्दीत जास्त कडक झाले असावे कारण हेमाद्रीचा चतुर्वर्गचितामणि हा धर्मशास्त्रावरील थोर ग्रथ याचवेळी रचण्यात आला स्वत हेमाद्रि हा मुख्य प्रधान असल्यामुळे धर्मदडाला राजदडाचे सहाय्य मिळाले असावे

अशा प्रकारच्या धार्मिक परिस्थतीत महानुभाव आणि वारकरी सप्रदाय उदयास आले, त्यापैकी वारकरी सप्रदाया–सबधी वर माहिती दिली आहे ह्या दोन्ही पथाचे उपास्यदैवत वासुदेवकृष्ण हे एकच होते तरीपण त्याच्या तत्त्वज्ञानात व आचारविचारात फरक होता महानुभाव पथाचे आद्यप्रवर्तक श्री चक्रधरस्वामी अथवा चागदेव राउळ हे गुजरात प्रातातील सामवेदी ब्राम्हण असून वैराग्य प्राप्त झाल्यावर त्यानी रामटेकच्या यात्रेच्या निमित्ताने वऱ्हाडातील रिद्धपुरगावी वास्तव्य करणाऱ्या गोविदप्रभु या सिद्धपुरुषाचा उपदेश घेतला त्यानतर त्यानी बरेच पर्यटन केले. आपल्या धार्मिक कार्यासाठी त्यानी महाराष्ट्राचीच निवड केली कानडदेशा तेलगदेशा न वचावे महाराष्ट्री असावे अशी त्याची आपल्या शिष्याना आज्ञा असे चक्रधरस्वामीनी आपल्या आयुष्यात कृष्ण, महादेव आणि रामदेव या तिघाहि यादवाच्या राजवटी पाहिल्या होत्या लोणारास चक्रधराचे वास्तव्य असताना एकदा कृष्णयादव आपल्या धाकट्या भावाला म्हणजे महादेवाला बरोबर घेऊन स्वामीच्या दर्शनास आला होता महादेवानेहि नतर श्रीचक्रधराची एकदोनदा भेट घेण्याचा प्रयत्न केला परतु चक्रधराने स्वत च ती गोष्ट टाळली यावरून ह्या यादवराजाची सत्पुरुषाच्या ठायी भक्ति होती असे दिसते

या दोघाच्या संबधाने चक्रधर आदराने बोलतात महादेव राजा राजधर्म आणे कान्हरदेवो आस्तिक ' परतु रामदेवासबधाने मात्र ते निपरवसु म्हणजे निष्ठुर असे उद्‌गार काढतात ज्या रामदेवाला ज्ञानेश्वर न्यायाते पोसणारा असे म्हणतात त्यालाच चक्रधर स्वामी निष्ठुर ही पदवी देऊन आपली नापसती व्यक्त करतात यावरून रामदेवाच्या निष्ठुरपणाची कृत्ये चक्रधराना माहीत असली पाहिजेत देवगिरीची गादी मिळविण्यासाठी रामदेवाने कोणते कारस्थान रचिले होते ही गोष्ट चक्रधराला माहीत असावी या दृष्टीने लीळा चरित्रातील " सविता नाथी वस्ती " ही लीळा महत्त्वाची आहे त्या लीळेवरून रामदेवाने आमण देवाला गादीवरून खाली उतरवून त्याचे डोळे काढले. आणि स्वतः रामदेव गादीवर बसला असे स्पष्ट दिसते ' राज्यातर झाले रामदेवो रावो राज्यी बैसला आमणदेवो खालि उतरीला देव-गिरी पालटीली आमणदेवाचे डोळे काढिले- (लीळाच पूर्वार्ध भाग ४ पान ३६-) ह्या महत्वाच्या ऐतिहासिक घटनेला महानुभावाच्या वर दिलेल्या लीळेखेरीज दुसरा पुरावा उपलब्ध नव्हता तो रामदेवाच्या शके १२३२ च्या पुरुषोत्तमपुरी ताम्र पटावरून आता उपलब्ध झाला आहे त्या ताम्रपटात गादी मिळ-विण्याकरिता रामदेवाने कोणते कारस्थान रचिले होते याचा उल्लेख आहे महादेवानतर त्याचा मुलगा आमण हा गादीवर बसला परतु रामदेव हा वडील भावाचा म्हणजे कृष्णाचा मुलगा असूनहि त्याला गादी मिळाली नाही वस्तुत कृष्णानतर त्याचा मुलगा रामदेव याला गादी वारस या नात्याने मिळावयाची ती न मिळता महादेवाला मिळाली याचा परिणाम आमणाच्यावेळी राज्यांतरात झाला ही गादी मिळविण्याकरिता रामदेवाने आप-

त्या सशस्त्र शिपायाना नर्तिकाचे स्त्रीवेश देऊन आपल्या बरोबर किल्लयात नेले दरबारात नाचगाणे चालू असताना आमण आणि त्याचे अधिकारी पाहण्यात दग झालेले पाहून रामदेवाने या वेशधारी शिपायाना स्त्रीवेश फेकून देऊन हल्ला करण्यास सूचना दिली या कारस्थानात त्याला जय मिळाला त्यानतरची हकीकत लीळा चरित्रात दिली आहे यावरून रामदेवाने राज्य प्राप्तीसाठी जो निष्ठुरपणा दाखविला तो चक्रधरासारख्या महात्म्याला पसत पडणे शक्य नाही परतु नतरहि रामदेवाने महाराष्ट्रात धर्माच्या बाबतीत जे धोरण स्वीकारले ते चक्रधर आणि त्याचे शिष्य याना मान्य नव्हते असे दिसते वस्तुत चक्रधराचे शिष्य यादवाकडे श्राद्धाला जात असत गोपाळ पडित हे राजाचे वक्ते होते चक्रधराची एक थोर साधुपुरुष म्हणून जेव्हा प्रसिद्धि होऊ लागली तेव्हा राजाचे अधिकारी त्याच्या दर्शनाला येऊ लागले इतकेच नव्हे तर रामदेवाची पट्टराणी कामाइसा ही आनोबासाचे पुराण ऐकत असे त्याच्या ओळखीने पुढे ती नागदेवाला भेटण्यासाठी लिब्याला आली होती चक्रधराचा प्रमुख्य शिष्य नागदेवाचार्य याचा तिला उपदेशहि होता आणि हा उपदेश तिने रामदेवाच्या अनुमतीने घेतला होता असे स्मृतिस्थळातील उल्लेखावरून दिसते असे असताना रामदेवासबधाने नागदेवाचार्य देखील मलिक काफूरच्या स्वारीत "तो (रामदेव) सता महताचेया वोखटेया प्रवर्तला म्हणून धरला" असे म्हणतो यावरून रामदेवाने सतामहतासबधाने जे ओखटे धोरण स्वीकारले होते ते महानुभावाना मुळीच पसत नव्हते असे दिसते श्रीचक्रधर स्वामी आणि त्याचे प्रमुख शिष्य नागदेवाचार्य याचे रामदेवाच्या बाबतीत असे प्रतिकूल मत का झाले ? महानुभाव महताचे प्रचलित

वर्णाश्रम धर्माच्या विरोधी आचार विचार रामदेवाच्या धोरणा-विरुद्ध तर नसतील ना ? तमाच प्रकार असावा लीळाचरित्रा वरून एक गोष्ट मात्र लक्ष्यात येते ती ही की, सन्यास घेतल्या-नतर चक्रधराची प्रसिद्धि जास्त झाली त्याचा शिष्यसमुदाय वाढू लागला एखाद्या मस्थानिकाप्रमाणे त्याचे स्वागत होऊ लागले मूर्तिपूजा, जातिभेद, अस्पृश्योद्धार इत्यादि मामाजिक बाबीसबधी आपल्या मुधारकी विचागाचा उपदेश ते लोकाना करू लागले त्यानी आपल्या शिष्यपरिवारात स्त्रियाचाहि समा-वेश केला आणि त्या स्त्रियाना पथाची दीक्षा देण्याला सुरवात केली यामुळे कर्मठ ब्राह्मण सन्याशी त्याचा द्वेष करू लागले ब्रम्हमान आणि महदाश्रम या दोघा महतानी चक्रधराचा विष-प्रयोग करून अत करण्याचा देखील प्रयत्न केला परतु तो फसला चक्रधर आमचा मार्ग उच्छेदिती असा त्याच्यावर हे मन्याशी आरोप करू लागले परन्तु चक्रधरानी त्याकडे दुर्लक्ष करून आप-ल्या पथप्रसाराचे कार्य जारी ठेवले त्याकरिता महाराष्ट्रात त्यानी चोहोकडे पर्यटन केले ज्यावेळी चक्रधर आपल्या पथ प्रसाराचे कार्य करीत होते त्याचवेळी रामदेवाने पैठण व इतर क्षेत्रातील ब्राम्हणाना अग्रहारे देऊन वर्णाश्रम प्रधान वैदिक धर्मावरील आणली निष्ठा व्यक्त केली चक्रधराच्या क्रातिकारक उपदेशामुळे पैठण येथील ब्राम्हणवर्ग असतुष्ट झाला होता या वर्गात महदाश्रम हा सन्याशी अर्थात् प्रमुख होता त्यानी हेमाद्री कडे चक्रधराच्या विरुद्ध तक्रार केली तिला अनुसरून हेमाद्रीने शिपाई पाठवून चक्रधराला बोलावून आणले आणि पैठण येथील धर्मसभपुढे त्याची चौकशी करण्यात आली तक्रार करणाऱ्या वादीनी जे आरोप चक्रधरावर केले होते ते मभेपुढे सिद्ध झाले

नाहीत असे दिसते त्यामुळे मारुतेहरि आणि प्रज्ञासागर सन्यासी या दोघा न्यायधीशाना पैठणकर ब्राह्मणानी चक्रधराना व्यर्थ त्रास दिल्याबद्दल वाईट वाटले आणि त्यानी चक्रधराना सोडून देण्यास सागितले (पहा—लीळा चरित्र उत्तरार्ध कृद्धासगमी अव-स्थान ही लीळा )

श्री चक्रधराची या चोकशीतून जरी सुटका झाली तरीपण पुढे रामदेवाने स्वत दाडी पाठवून चक्रधराना बोलावून आणिले राजसभेत दाडी आल्यावर चक्रधराशी दोन शब्द बोलण्याची राजाची इच्छा दिसली परतु जवळ बसलेल्या हेमाद्रीने शिपायाना शिव्या देऊन दाडी वधस्थानाकडे नेण्यास सागितले तेथे चक्र-धराना राजाने दिलेली देहाताची शिक्षा मारेकऱ्याच्या हाती अमलात आणली गेली असे 'आजी गोविद गती म्हणणे' या लीळे वरून स्पष्ट होते ह्या कामात हेमाद्रीचेच प्रमुख अग होते असे वाटते रामदेवाला चक्रधरासबधी फारशी माहिती नसावी असे "कैसा जोगिया बरवा" या त्याच्या उद्गारावरून वाटते

रामदेवाने श्रीचक्रधराना दिलेली शिक्षा न्यायाची तर नाहीच पण एकदरीत यादवाच्या पूर्वीच्या उदार धोरणाला ती कितपत सुसगत आहे हाहि प्रश्न आहे पैठण येथील न्यायसभेत आणि शेवटच्या शिक्षेच्यावेळी देखील श्रीचक्रधरानी आपण भिक्षु महात्मे कोणाचे काही न करी असे उत्तर देऊन आपला निरप-राधीपणा सिद्ध करण्याचा प्रयत्न केला त्यानी आपल्या पथाची दीक्षा—कुणाला जबरदस्तीने दिली नाही त्याच्याकडे स्वखुशीने जे आले त्यानाच त्यानी आपल्या पथात घेतले त्यानी आपल्या वेध-वती शक्तीने स्त्रीपुरुषाना वश करून आपल्या भजनी लाविले—विशेषत चागदेव राऊळाच्या ठायी स्त्रियाचा वेधू—हा त्याच्यावर

ममकालीन प्रतिस्पर्धी महताचा आरोप होता परतु त्याचा दोष तत्कालीन धर्मभोळ्या ममाजालाच जास्त लागू पडतो परतु ज्या यादवराजानी जैनामारख्या अवैदिक पथाला आणि वीरशैवा मारख्या मुधारक सप्रदायाच्या अनुयायाना देणग्या देऊन आपल्या उदार धोरणाचा प्रजेला लाभ करून दिला, त्याच्याच पैकी राम- देवामारख्या एका वैभवशाली राजाने वेदिकधर्मातर्गतच पण आचार विचाराच्या बाबतीत काहीशी भिन्नता ठेवणाऱ्या महानु- भाव पथावर अशा प्रकारे राजदडाचे शस्त्र धरावे याचे कारण काय ? जैन आणि वीरशैवाना कर्नाटकात ज्या देणग्या मिळाल्या होत्या त्या यादवाच्या अधिकाऱ्यामार्फत मिळाल्या होत्या हे वर सागितलेच आहे अधिकारी नेमण्याच्या बाबतीत यादवराजे गुणाकडे पहात असत, धर्म किवा जातिकडे पहात नसत असे दिसते दुसरे यादवाच्या काळात जनधर्म प्राचीन असल्यामुळे त्याला स्थिर स्वरूप आले होते म्हणजे वैदिकधर्माच्या आचार विचारात ढवळाढवळ न करिता त्याने आपले स्वतत्र बिऱ्हाड थाटले होते वीरशैवपथ बाराव्या शतकात जरी स्थापन झाला होता आणि त्यावेळी महानुभावाप्रमाणे त्या पथाचे सस्थापक बसव याचे तत्कालीन राजा बिज्जल कलचुरी याच्याशी भाडण झाले होते तरी पण पुढे शभर वर्षानी कृष्णयादवाच्या काळी परिस्थिति बरीच बदलली होती त्या पथाचे महत आपल्या आचाराने बहुजन समाजात लोकप्रिय झाले होते त्यामुळे याद- वाचा त्याना आश्रय मिळाला परतु महानुभाव पथाचा उदय नुकताच झाला होता लिगायत पथाप्रमाणे धर्माच्या बाबतीत त्या पथाचे आचार विचार समकालीन वैदिकधर्म विरोधी होते आणि शिवाय रामदेवकाळी वर सागितल्याप्रमाणे वर्णाश्रम धर्माला

जास्त महत्व प्राप्त झाले होते याचाच परिणाम म्हणजे पंथ संस्थापक चक्रधरस्वामी याना पैठणसारख्या क्षेत्रातील धर्ममार्तंडाचा छळ सहन करावा लागला

श्री गोविंदराज महानुभाव यानी चित्रमयजगत् या मासिकातील आपल्या लेखात ज्ञानेश्वराना देखील या विरोधकाचा छळ सहन करावा लागला आणि या छळाला कटाळून त्यानी समाधीच्या नावाने आत्महत्या केली अथवा विरोधकानी त्याना जबरदस्तीने जिवंत समाधि दिली असे आपले मत दिले आहे या मतात तथ्याश कितपत आहे हे त्या बाबतीत समकालीन पुरावा उपलब्ध नसल्यामुळे काहीच सागता येत नाही ज्ञानेश्वराना बालपणी ब्राह्मणवर्गाचा छळ सहन करावा लागला ही गोष्ट प्रसिद्ध आहे परंतु पुढे त्याच्या कार्याला देखील समकालीन वरिष्ठवर्गाचा विरोध झाला असेल आणि त्याची मजल आत्महत्येपर्यंत गेली असेल असे वाटत नाही याचे कारण एकतर नाथपंथ हा महाराष्ट्राला ज्ञानेश्वर काळी नवीन नव्हता तो पंथ बराच प्राचीन असल्यामुळे नाथपंथी योग्याची प्रसिद्धि फार होती मुकुंदराज हे ज्ञानेश्वरापूर्वी होऊन गेले ते देखील नाथपंथी होते परंतु त्याचा छळ झाला होता असा उल्लेख नाही उलट त्याना राजाश्रय होता लीळाचरित्रात अनेक नाथपंथी योग्याची माहिती दिलेली आहे परंतु त्याच्या छळासंबधी उल्लेख नाहीत ज्ञानेश्वराना रामदेव यादव किंवा त्याचा अधिकारीवर्ग याचा छळ सहन करावा लागला असता तर त्यानी आपल्या ग्रंथात न्यायाने पोषी क्षितीशु असे प्रशसापर उद्गार काढले नसते दुसरे असे की, ज्या वारकरी पंथाचा उदय ज्ञानदेवाच्या प्रेरणेने झाला त्या पंथाचे आदिपीठ जे पंढरपुर त्यावर स्वत रामदेव आणि त्याचा

प्रधान हेमाद्रि याची कृपा होती उलट चक्रधर स्वामीनी लीळा चरित्रात पढपुरच्या विठ्ठलाच्या उत्पत्तीसबधाने वहुजन समा-जात गैरसमज उत्पन्न होईल अशा प्रकारची एक विचित्रच कथा दिली आहे ही उत्पत्तिकथा वीठलवीरु कथन या लीळेत आलेली आहे ती लीळा महत्त्वाची असल्यामुळे येथे देत आहे —

महादाइसी पूसिले जीजी वीठलविरु श्रीकृष्ण चक्रवर्तीचा अवतारु बोलताति हे काइजी सर्वज्ञे म्हणीतले वाइ वीठलु तो म्हातारी एकीचा पूत्र तो ब्राम्हणु आणि नेमदेव तो कोळी म्हाया गुरउ हे तीघै चोर वळणीया घेती पोडयाचे वळघे करिति वोरपे दरवडे घेति एकु घेणे घेउनिजाए दोघ लागु मावरिति ते मगळ वेढाचे तीही एकी ठाड वळघा केला तो माइदरणा गाइ घेउनिगेला तव लागु पडिला तो नेमदेवकोळी घाइ पडिला पाठी तीए पाढरिए वरी वीठलु पडीला तेयाचे पुत्र आले तेही तेथ भडखबा केला मातालीग स्थापना केली तेथ देवता अभिमानु घेतला लोकाचे मनोर्थ पुरउ लागला तेया-चिए स्त्रिए नाव लाखाइ एकी वामना लखमाइ तेयाचे पुत्र जाति पदे करिति ते वीठो रुक्मिणी अभगी घालीति तो लोका मध्ये उपाधीते पावला तोहा वीठलु बाइ तोघटिकामीधि जाणे पौळी पगारु उडे स्त्रिया भोगु एसा तो वीठलु " ( उत्तरार्ध लीळा ) या लीळेतील वीठलु, नेमदेव, मगळवेढे, पाढरिए, वीठो रुक्मिणी अभगी घालीति, या शब्दावरून पढरपुरातील विठ्ठला सबधीचीच ही कथा आहे हे उघड दिसते विठ्ठल ही देवता शिलालेख ताम्रपटातील उल्लेखावरून किती प्राचीन आहे तसेच त्या देवतेवर आधी होयसळ आणि नतर यादव याची किती भक्ति होती हे वर सागितलेच आहे या खेरीज हेमाद्रीच्या तीर्थ खडात

" भैम्याश्चैत्र तटे देवि दक्षिणे तीर्थमुत्तम । अस्तिक्षेत्र दैवत च सर्वोत्कृष्ट सुदुर्लभम् ॥ पाडुरगश्च तत्रास्ते मूर्तिमान देवतोत्तम असा विठ्ठलाच्या स्तुतिपर श्लोक आहे हेमाद्रिसारख्या धर्म-शास्त्रकाराने पाडुरग विठ्ठलाचा असा आदराने उल्लेख करावा यावरून यादवकाली या क्षेत्राचा महिमा किती वाढला होता हे उघड होते त्याच विठ्ठलाची श्री चक्रधरानी अशा प्रकारची दिलेली उत्पत्ती खरी असती तर त्या देवतेसबधी महाराष्ट्रातच काय परतु कर्नाटक तेलगाणातदेखील आदर निर्माण झाला असता किवा नाही याची शकाच आहे मग राजाश्रयाची गोष्टच नको. यावरून ही कथा एकतर बनावट असावी अथवा अशा प्रकारची कथा सागून आपल्या भक्ताच्या मनात समकालीन भागवत धर्मासबधाने अनादराची भावना निर्माण करण्याचाहि त्या कथेत उद्देश असावा दुसरीच कल्पना जास्त सभवनीय वाटते स्मृतिस्थळात विठ्ठलभक्तिसबधाने एका शिष्याने प्रश्न विचारला असता महदबा त्याच्यावर रागावली वस्तुत वारकरी पथ आणि महानुभाव याचे उपास्यदैवत भगवान श्रीकृष्ण हे एकच असल्या-मुळे महानुभावाना पढरपुरातील विठ्ठलासबधाने भक्ति जरी नसली तरी पण आदराची भावना असावयाला पाहिजे परतु वर दिलेल्या लीळेवरून तशी ती दिसत नाही इतकेच नव्हे तर विठ्ठल हे कृष्णाचेच रूप आहे ही कल्पसाच त्याना मान्य नाही प. बाळकृष्णशास्त्री महानुभाव यानी आपले यासबधी स्पष्टमत दिले आहे (महानुभावपथ पान ३३८)

महानुभावपथाची अशा प्रकारची मते आणि त्याचे सुधा-रकी आचारविचार यामुळे समकालीन समाजात त्या पथासब-धाने गैरसमज उत्पन्न होऊन त्याची परिणती द्वेषभावनेत झाली

असावी याच्या उलट वारकरी संप्रदायाने प्रचलित धर्मातील आचारविचाराना धक्का न लावता सर्वसंग्राहकवृत्तीने आपल्या पंथाचा प्रसार केला त्यात त्याना बहुजन समाजाचे साहाय्य मिळाले त्यामुळे त्याची लोकप्रियता उत्तरोत्तर वाढत गेली आणि महानुभाव पंथ या शर्यतीत मागे पडला

असो येथवर यादवाचे समकालीन धर्मपंथासंबंधाने एकंदरीत धोरण कसे होते हे सांगितले आहे आता त्याचा मराठी साहित्याला कितपत आश्रय होता हे पाहू

मुकुंदराजाचा विवेकसिंधु सोडल्यास यादवकालीन मराठी साहित्य रामदेवाच्या राजवटीतलेच उपलब्ध आहे के पांगारकरासारखे विद्वान यादवाचा मराठीला संस्कृताप्रमाणे आश्रय होता असे सांगतात याच्या उलट डॉ कृष्णा 'यादव हे कानडी असून त्यानी मराठीपेक्षा कानडीभाषा आणि वाङ्मय याना उदार आश्रय दिला' असे आपले मत देतात (पहा Trans. All India History Congress 5th Session 1941 ) आणि या मताला आधार म्हणून यादवाची मराठीपेक्षा कानडी दानशासने जास्त आहेत असे सांगतात निव्वळ लेखाचा विचार केल्यास देवगिरीच्या यादवाचे संस्कृत आणि कानडी भाषाच्या प्रमाणात मराठी लेख किंवा ताम्रपट कमी उपलब्ध आहेत यादवकालातले मराठी लेख सापडतात नाही असे नाही पण कमी प्रमाणात आतापर्यंत उपलब्ध झाले आहेत परंतु त्यावरून यादवाचा कानडी भाषेला आणि साहित्याला आश्रय होता हे सिद्ध होत नाही याचे कारण कर्नाटकावर यादवाचा अम्मल होता आणि त्या प्रांतात यादवाच्या पूर्वीपासून संस्कृत आणि कानडी या दोन्ही भाषातून दानशासने लिहिण्याची प्रथा होती राष्ट्रकूट

चालुक्याचे लेख उदाहरणादाखल देता येतील तीच प्रथा पुढे यादवाच्या अमदानीत त्याच्या कानडी अधिकाऱ्यानी चालू ठेवली दुसरे असे की, कानडी वाङमय मराठीपेक्षा जुने आहे आणि त्या साहित्याला राजाश्रम पूर्वीपासूनच होता त्याचा परिणाम यादवाच्या दानशासनावर झाला असावा परन्तु कानडी वाङ-मयाला यादवाचा आश्रय होता असे म्हणता येत नाही ज्ञाती-श्वर पुराणाचा कर्ता कमलभव ह्या जैन कवीला रामदेवाचा आश्रय होता असे काही सशोधकाचे मत आहे परतु या एका उदाहरणावरून यादवाचा कानडी वाङमयाला राजाश्रय होता हे सिद्ध होत नाही कारण तसा प्रकार मराठीतहि आहे नरेंद्र पडिताने रामदेवाकरिता रुक्मिणीस्वयवर रचल्याबद्दलचा उल्लेख महानुभावाच्या स्मृतिस्थळात आहे परतु रामदेवाने त्या काव्याचे कर्तृत्व आपणाला मिळावे म्हणून त्याकरिता नरेंद्राला पुष्कळ द्रव्य देण्याची इच्छा प्रकट केली तेव्हा नरेंद्राने 'असे केल्याने आमच्या कविकुळाला बोल लागल' असे उत्तर देऊन आपल्या काव्याचा बाजार माडण्याचे नाकारले यावरून तत्कालीन मराठी कवीच्या मनोवृत्तीचा बोध होतो नरेंद्रासारख्या दरबारी कवीने देखील राजाश्रयाकरिता आपले काव्य विकण्याला साफ नकार दिला इतकेच नव्हे तर राजदरबार देखील सोडून दिला मग इतर सतामहतामबधाने बोलायलाच नको. त्यानी आपली साहित्यनिर्मिति लोकजागृतिकरिता केली लोकाचा उद्धार व्हावा हाच थोर उद्देश मनात धरून त्यानी ग्रथाची रचना केली आणि म्हणूनच यादवकालीन मराठी वाङमय धर्मपर आहे इतर लौकिक विषयाना त्यानी स्पर्श केला नाही परतु हे सतमहत सोडले तरी इतर सस्कृत पडिताना उत्तेजन देऊन यादवानी

मराठी साहित्याची जोपासना का केली नाही? यादवराजे विद्येचे आश्रयदाते नव्हते असे म्हणावे तर तसाहि प्रकार नाही त्यांच्या अमदानीत अनेक संस्कृत ग्रंथांची रचना झाली ही गोष्ट प्रसिध्द आहे उदाहरणार्थ शारंगधराचा संगीत रत्नाकर, हरपालदेवाचा संगीत सुधाकर भानुपंडिताचा सूक्ति मुक्तावली, बोपदेवाचे मुग्धबोध व्याकरण तसेच आयुर्वेद रसायण इत्यादि ग्रंथ लौकिक विषयावर रचिले गेले याखेरीज धर्मशास्त्र, वेदांत आणि पुराणे यावर तर अनेक ग्रंथ याच कालात रचण्यात आले आणि हे ग्रंथ रचणारे यादवांचे आश्रितच होते इतकेच नव्हेतर त्यापैकी कित्येक यादवांच्या दरबारात मोठमोठे अधिकारी आणि दरबारी पंडित होते यादवांनी मनात आणले असते तर समकालीन तेलगी आणि कानडी साहित्याप्रमाणे मराठीत या आश्रित पंडि ताकडून मराठी साहित्याची उत्तम सेवा झाली असती आणि आज या कालातले विशिष्ट प्रकारचे म्हणजे धर्मपर मराठी साहित्य जे दिसते त्याबरोबर लौकिक विषयावरहि विपुल ग्रंथ-संपत्ति उपलब्ध झाली असती परंतु यादवांनी आपल्या आश्रित पंडितांना मराठीत रचना करण्याबद्दल प्रोत्साहन दिले नाही याच्या उलट तेलगण आणि कर्नाटकात निराळाच प्रकार दिसतो तेलगी आणि कानडी वाङमयांना आरंभ राजाश्रयानेच झाला कानडीतील पहिला ग्रंथ कविराजमार्ग याची रचना स्वत राष्ट्र-कूट राजा नृपतुंग याने केली अशी प्रसिध्दि आहे त्याच्यानंतरचे कानडी महाकवि पंप पोन आणि रन्न यांना समकालीन राजाचा आश्रय होता त्याचप्रमाणे तेलगूतील पहिला ग्रंथ 'महाभारत' याची रचना नन्नया नावाच्या दरबारी पंडिताने राजराजनरेंद्र याच्या प्रोत्साहनाने आणि सूचनेवरून केली याच महाभारताच्या

पुढील भागाची रचना तिकण्णा नावाच्या मनुमसिद्धि राजाच्या प्रधानाने केली हेमाद्रिप्रमाणेच तिक्कण्णा हा कवि मुत्सद्दी आणि पंडित अशा दोन्ही दृष्टींनी प्रसिध्द होता परंतु त्याने संस्कृतपेक्षा आपल्या मातृभाषेला जास्त महत्त्व देऊन मोरोपंताप्रमाणे भारताची रचना केली ही गोष्ट भूषणावह आहे ! आपल्या यादवराजांनी शेजारच्या प्रांताचे साहित्याच्या बाबतीत अनुकरण केले असते तर प्राचीन मराठी वाङमयात अमूल्य भर पडली असती काही मेस्तके आणि पत्रव्यवहारपद्धति हेमाद्रीच्या नावा वर आहेत परंतु याला भरीव साहित्यनिर्मिति म्हणता येणार नाही हे ग्रंथदेखील हेमाद्रीचे आहेत किंवा नाही याची शंकाच आहे यावरून यादवांचा मराठी साहित्याला आश्रय होता मराठीभाषा आणि वाङमय यांची वाढ यादवांच्या आश्रयाने झाली हे मत निराधार वाटते ★

---

★ अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेच्या मुंबई येथे भरलेल्या अधिवेशन प्रसंगी वाचलेला निबंध

---

# श्रीएकनाथ आणि नरेंद्र पंडित.

प्राचीन मराठीकाव्यात रुक्मिणी स्वयवरा इतका लोकप्रिय कथाविषय दुसरा आढळत नाही या स्वयवराची मोहिनी आमच्या कवीवर इतकी होती की, आतापर्यंत या प्रसगावर सुमारे सोळा कवीनी आपली काव्ये रचिली आहेत असे प्रो गो वि तुळपुळे सागतात तसेच तितक्याच सख्येने महानुभाव कवीनी या कथेला आपल्या प्रतिभेचे लेणे चढविले असे श्री वा ना देशपाडे याचे मत आहे याचे कारण बहुतेक सर्व प्राचीन मराठी कवीची मग-तो सत असो अथवा महत असो–भगवान गोपालकृष्णावर निरतिशय भक्ति होती वारकऱ्याचे आणि महानुभावाचे तर ते उपास्यदैवतच होते भगवताच्या अवतारकार्यांत अत्यत हृदयंगम आणि रोमहर्षक जर कोणता प्रसंग असेल तर तो हाच होय असे कोणीही सागेल तेव्हा मराठी साहित्याच्या आरभापासून आपल्या कवीना या विषयाची गोडी लागावी यात नवल नाही या दृष्टीने मुकुदराजाचा विवेकसिधु हा वेदातपर ग्रथ सोडल्यास मराठी काव्याची प्रभात या कथेनेच झाली असे म्हणण्यास हरकत

नाही आणि यातहि या विषयावर काव्य रचण्याचा पहिला मान एका स्त्रीला मिळाला आहे हे वैशिष्टच आहे महानुभाव पथाची स्थापना करणारे श्रीचक्रधरप्रभु याची प्रिय शिष्या महदबा हीच ती आद्य कवियत्री होय या महदबेचे धवळे महानुभाव मराठी वाङमयात प्रसिद्ध आहेत

परतु महानुभावपथात महदबेच्या धवळचापेक्षा नरेद्राच्या रुक्मिणी स्वयवराला जास्त महत्व आहे महानुभावाच्या सुप्रसिद्ध साती ग्रथात नरेद्राला स्थान आहे पण धवळचाना नाही. यावरून नरेद्राच्या या काव्याची किती योग्यता आहे हे सहज कळून येईल नरेद्राच्या स्वयवराप्रमाणेच वारकरी साप्रदायात श्रीएकनाथाच्या रुक्मिणीस्वयवराची देखील फार प्रसिद्धि आहे या कथेसबधाने नाथ महाराज 'नित्य नूतन इची गोडी' असे प्रशसापर उद्गार काढतात आणि त्याप्रमाणे नाथाचा हा काव्यग्रथ महाराष्ट्रातील हजारो भाविक स्त्रीपुरुषाच्या आजहि नित्य पाठातला आहे कित्येक तरुण व्यक्ति अनुरूप वराच्या किवा वधूच्या प्राप्तीच्या इच्छेने हा नाथग्रथ वाचीत असतात तसेच पुष्कळ कुलवधु तुळशीच्या पूजेनतर श्रीगोपाळकृष्णाच्या मूर्ति सन्निध बसून ह्या ग्रथाचे भक्तिभावाने पारायण करतात. कृष्णदयार्णवासारखे मराठी कवि देखील या ग्रथाची मुक्त कठाने स्तुति करतात. यावरून रुक्मिणीस्वयवराच्या आतापर्यत उपलब्ध झालेल्या अनेक मराठी अवतारांमध्ये एकनाथ आणि नरेद्र या दोनच कवीच्या कलाकृतीना मराठी साहित्यात मानाचे जे थोर स्थान प्राप्त झाले आहे त्याचे कारण त्या कवीची लोकप्रसिद्धि हे तर आहेच पण त्यापेक्षाहि त्या ग्रथाची योग्यताहि मोठी आहे ही गोष्ट तितकीच खरी आहे प्रस्तुत स्थळी या दोन ग्रंथातील

काव्यगुणाचा तुलनात्मक दृष्टीने विचार करण्याचे योजिले आहे.

परतु एका अर्थी अशा प्रकारची तुलना या दोन ग्रथाचा मामग्ऱ्याने विचार केल्यास तितकीशी सोईची वाटत नाही. याचे कारण एक तर नरेंद्राचा सपूर्ण ग्रथ आज उपलब्ध नाही डॉ कोलते यानी त्या ग्रथाच्या फक्त ८७९ ओव्या प्रसिद्ध केल्या आहेत बाकीचा कथाभाग जो नरेंद्राच्या नावावर तळेग्रामकर कृष्णराज दादा महानुभाव याच्या सग्रही आहे, तो नरेंद्राने स्वत रचला नसावा असे प्रो कोलते याचे मत आहे दुसरे असे की नरेंद्र पडित आणि श्रीएकनाथ महाराज याच्या कालामध्ये जसे अतर आहे, तसेच त्याच्या रचनाकौशल्यामध्येहि आहे नरेंद्राने आपले काव्य देवगिरीच्या रामदेव यादवा सारख्या वैभवसपन्न राजाच्या राजवटीत रचिले इतकेच नव्हे तर स्मृतिस्थळ या प्राचीन महानुभाव ग्रथातील आख्यायिका जर विश्वसनीय मानली तर रामदेवाचा एक आश्रितकवि या नात्याने रामदेवाच्या सागण्यावरून रचिले असे म्हणण्यास हरकत नाही यादवकालीन मराठी काव्यग्रथाचा—मग तो भास्करभट्ट महानुभावाचा आख्यानपर शिशुपालवध असो अथवा वारकरी साप्रदायाचे प्रमुख आचार्य ज्ञानेश्वर महाराज याचा ज्ञानेश्वरी सारखा वेदातपर "काव्या रावो" असो—त्या ग्रथाचा एक विशेष असा की, कल्पना वैभव आणि भाषाप्रभुत्व याचा मनोरम सगम अशा काव्यात आढळून येतो ज्ञानेश्वरानी या बाबतीत तर उच्चाक गाठला आहे नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयवराची योग्यता देखील या दृष्टीने कमी नाही ज्ञानेशाप्रमाणे नरेंद्राने "श्रीचक्रधराचा वाणिता कीर्तिचद्र । चढवीन सुखाचा समुद्र । जळसेन करीन म्हणे नरींद्र।

सभेचे लोक ।। " असा आत्मविश्वास आपल्या काव्यशक्ति संबधाने प्रगट केला आहे हे काव्य रचताना आपली भूमिका केवळ कथा सांगणाऱ्या साध्या कवीची नसून एका महाकवीची आहे अशी जाणीव ठेवून त्याने काव्याची योजना केली आहे त्याकरिता त्याने संस्कृत काव्यनाटकाचा अभ्यास केला असावा असे " आणिके काव्ये नाटके कथा आख्याने प्रबंध चित्र-गाथा" या त्याच्या उल्लेखावरून वाटते आणि या अभ्यासामुळेच एक उच्च प्रतीचे आख्यानपर काव्य मराठीत कसे रचावे याची त्याला कल्पना असावी कारण नरेंद्र काव्याच्या गुणवैशिष्ट्या संबधाने "कविता–कामिनीयेचा धरूनि हातु । भावो दोही आंगो मलपतु । चाले साहित्य–सांबरेया आंतु । रसु खेडकुळिये म्हणजे कवितारूपी कामिनीचा हातधरून भाव हा साहित्याच्या लता कुंजात डुलतडुलत चालतो " असे सांगतो. आणि अशा प्रकारचे काव्य निर्माण करण्यासाठी भाषेचे सौंदर्य आवश्यक आहे त्याकरिता नरेंद्राच्या मताने शब्द असे मधुर असावेत की, चंद्रकले जवळ आपल्या पराक्रमाच्या गोष्टी त्यांनी सांगाव्यात रुक्मिणीस्वयंवरातील वर्णनकौशल्य पाहून नरेंद्राच्या वरील उद्गाराची सत्यता पटते उदाहरणार्थ रुक्मिणीची विरहावस्था, धारा दामोधर, सायंकाल आणि चंद्रोदय यांची वर्णने कवीच्या स्वतंत्र प्रतिभाविलासाची साक्ष देतात.

यादवकालीन या महानुभाव कवीवरून आपण बहामनी सुलतानाच्या मुसलमान काळातील श्रीएकनाथाच्या रुक्मिणी स्वयंवराकडे जर वळलो तर आपणाला काय दिसते. तारुण्यात पदार्पण करून शृंगारसाजाने नटलेली नरेंद्राची कविताकामिनी वयोमानाने प्रौढ होऊन एकाद्या देशस्थ ब्राम्हणाच्या गृहपत्नी

प्रमाणे जणु काय पारतंत्र्याच्या सामुरवासामुळे धीरगभीर आणि विचारी झाल्या सारखी वाटते यौवनसुलभ नृत्यगायन आणि काव्य नाटकाची तिची आवड कमी होऊन आता प्रौढावस्थेत तिचे मन अध्यात्माच्या श्रवणाकडे वळते कारण नाथाची भूमिका एका प्रतिभासपन्न कलाकवीची नसून आत्मज्ञानाच्या शातीने वरलेल्या तत्वज्ञकवीची आहे आणि याच बैठकीवरून त्यानी रुक्मिणी स्वयवराची रचना केली आहे किबहुना नाथाच्या ह्या काव्यात एका साग अध्यात्मपर रूपकाचे वर्णन करण्यात आले आहे असे म्हणण्यास हरकत नाही त्यानी या कथेत रुक्मिणी कृष्णाच्या निमित्ताने जीवाशिवाचे लग्न लाविले आहे "ये ग्रथीचे निरूपण । जीवा शिवा होतसे लग्न । अर्थ पाहता सावधान । समाधान सात्विका ।।" असे नाथ महाराज स्वत च सागतात हे काव्य रचताना त्याची दृष्टि एका थोर भक्ताची आणि उपदेशकाची होती असे वाटते कारण " हे कृष्ण कथा अलौकिक । महादोषासी दाहक भवरोगासी छेदक । अर्धमात्रा सेवलिया "असे ग्रथासबधाने त्यानी आपले मत दिले आहे याप्रमाणे त्यानी ह्या ग्रथाची रचना भाविकासाठी मोक्षप्राप्तीच्या हेतूने जरी केली असली तरी पण काव्याला अगभूत असलेल्या अलकारादि गोष्टीकडे त्यानी दुर्लक्ष केले होते असे नाही कृष्ण आणि रुक्मिणी याच्या रूप आणि स्वभाव वर्णनात आपल्याला नाथाच्या कल्पनाशक्तीचा प्रत्यय येतो तसेच आख्यानपर काव्याच्या तत्राच्या दृष्टीने त्याच्या रचनाकौशल्याचे एक वैशिष्टच आपल्या नजरेत चटकन भरते. ते म्हणजे त्याचे कथानक कुठेहि रेगाळत नाही अथवा त्याच्या रचनेत पाल्हाळ किवा विषयातर याना फारसा वाव मिळत नाही नाही म्हणावयाला

त्यांनी रुक्मिणीच्या लग्नप्रसंगी थोडे विषयांतर केले आहे ते म्हणजे त्यांनी लग्नाच्या साहेळ्याचे वर्णन केले आहे त्याला मुळांत आधार नाही. याच्या उलट काहीसा नरेंद्राच्या रचनेचा प्रकार आहे एरव्ही कल्पनावैभव आणि रसाविष्कार या दृष्टीने रुक्मिणीची विरहावस्था अथवा किन्नराचें उपाख्यान कितीही सुंदर वाटत असले तरीपण पुनरुक्ति आणि विषयांतर या सारख्या दोषांना अशी वर्णने पात्र होतात हे विसरता येत नाही

रुक्मिणीस्वयंवराची ही कथा भागवत, हरिवंश विष्णुपुराण, आणि पद्मपुराण या संस्कृत ग्रंथांतून आलेली आहे पैकी नाथांनी आपल्या ग्रंथांतील प्रत्येक प्रसंगाच्या शेवटी " इति श्री मद्भागवते महापुराणे दशमस्कंधे हरिवंश संहिता संमते इ " असा आधारभूत ग्रंथांचा उल्लेख केला आहे या दोन पौराणिक ग्रंथांचा मागोवा घेऊन त्यांनी आपल्या काव्याची रचना करतांना स्वतःच्या कल्पनाशक्तीचा योग्य असा मालमसाला वापरला आहे इतकेंच नव्हे तर कृष्णाला पाठविलेल्या पत्रिकाप्रसंगांत त्यांनी मूळ भागवतांतील श्लोक देऊन त्यावर आपल्या मराठी टीकेची रचना केली आहे यावरून विषयांतर न करितां मूळ कथानक मराठींत आणतांना त्यांनी किती खबरदारी घेतली होती याची कल्पना करतां येते याच्या उलट नरेंद्राच्या रचनेचा प्रकार आहे भागवत आणि पद्मपुराण या ग्रंथांच्या आधाराने आपल्या ग्रंथाची रचना केली असे नरेंद्राने जरी सांगितले आहे तरीपण त्याच्या काव्यांतील किन्नराच्या उपाख्यानासारखे कांही प्रसंग मूळ भागवत अथवा पद्मपुराण या ग्रंथांत आढळत नाहींत यावरून त्याने आपले काव्य रचतांना विषयांतराचा दोष पत्करून आपल्या स्वतंत्र प्रतिभेचा विलास दाखविला आहे असाच प्रकार

रुक्मिणीच्या विरहावस्थेसबधाने झाला आहे तीन्ही पुराण ग्रथामध्ये या अवस्थेचे वर्णन नाही आपण पत्रिका देऊन कृष्णाकडे पाठविलेला ब्राह्मण लवकर परत येण्याचे जेव्हा रुक्मिणीला चिन्ह दिसेना तेव्हा ती फार चितातुर झाली असे वर्णन भागवतात आहे तसेच तिच्या मनाविरुद्ध रुक्मी शिशुपालाला देण्याचे ठरवितो त्यावेळी ती खिन्न होते परतु विरहाने व्याकुळ होत नाही पुराणातील रुक्मिणी विचारी आहे ती धीर धरून आपला विश्वासु ब्राम्हण पत्रिका देऊन कृष्णाकडे पाठविते नाथानी आपल्या ग्रथात रुक्मिणीने कृष्णाच्या स्वरूपाचे वर्णन ऐकल्यावर "आग जाहले रोमाचित । कठी बाष्प पै दाटत । शरीर चळचळा कापत। पडली मूर्च्छित धरणीये " असे तिच्या अवस्थेचे वर्णन केले आहे परतु पुढे सावध झाल्यावर रुक्मी आपल्या मनाविरुद्ध शिशुपालाला देण्याचा निश्चय करतो हे तिला जेव्हा समजते तेव्हा ती स्वत "कृष्ण प्राप्तीचा विचारू। तेथे करू नये दुजियाचा सचारू । वृत्ती करावी तदाकारू । धैर्य बळे आपुलेनी ।। अशी धीराची गोष्ट सागते म्हणजे नाथानी जवळ जवळ भागवताचाच अनुवाद केला आहे परतु नरेंद्राने रुक्मिणीच्या विरहावस्थेचे केलेले वर्णन काव्यमय जरी असले तरी पण इतके विस्तृत आणि पुनरुक्त झालेले आहे की पुढेपुढे त्याच त्या कल्पना पाहून वाचकाला एक प्रकारे कटाळा येतो. प्रकाशित ग्रथाचा एक तृतीयाश भाग या वर्णनाने व्यापला आहे हा पुनरुक्तीचा दोष नरेंद्राच्या काव्यात बराच आढळतो उदाहरणार्थ रुक्मिणीच्या स्वरूपाचे वर्णन तीन चार ठिकाणी आलेले आहे भीमकाच्या गृहपरिवारात रुक्मिणीचे वर्णन करताना नरेंद्र म्हणतो "पाता डोळेयाचे भाव । ते मृगी कमळासी नाही बरव । ब्रम्हसुख भोगावया दैव कवणासी असे?"

या वर्णनात संस्कृत कवीची प्रसिद्ध उपमाने मृगी कमळ ही आलेली आहेत परतु लगेच पुढे नरेंद्र म्हणतो "एकेका अवेवाचे बरवेपण बोलता विषया होईल माजवण। पुन साधूचे घडैल दुशण जऱ्ही मुनी जाले" यावरून प्रत्यक्ष भगवताच्या पत्नीच्या अवयवाचे वर्णन करणे म्हणजे शृगार विषय माजविल्यासारखे आहे आणि शिवाय अशा वर्णनाला साधु सत्पुरुष दूषण देतील म्हणून ते बरे नव्हे अशी कवीला जाणीव आहे परतु नतर कवीने रुक्मिणीने सभेत प्रवेश केल्यावर पुन तिचे वर्णन केले आहे ते सुदर साधले आहे उदाहरणार्थ खालील ओव्या पहा –

"की ते सुखाची सैंभ की परिमळाची अक्षोभ
की रूपासि आली भाभ शृगाराची

की ते युवन–मढिची अबिका। की सौदर्य–लोकिची तारका
नातरि जन्म–पत्रिका मन्मथाची

की ते सौभाग्याची निधी की बरवेपणाची आवधी
की साबेव दिव्य औषधी। वस्यकरणाची इ

वरील वर्णनावरून कवीचे कल्पनावैभव तर दिसतेच परतु त्या खेरीज ज्ञानेश्वराप्रमाणे अलंकाराची शोभा मालास्वरूपामुळे जास्त वाढलेली आहे समुद्रावर एकामागे एक येणाऱ्या लाटाप्रमाणे या अलकाराची गमत वाटते यापुढे रुक्मिणीच्या अगावरील निरनिराळ्या अलकाराचे वर्णन कवीने केले आहे त्या पैकी "मुखचद्र ते मदन–सजिवनी। शुक्रु मार्गों आल्रा उसिनी। तैंसे मोतीं मिरवे वदनी। रुक्मिणीचेया। यातील नाकातील नथे मुळे रुक्मिणीचे मुख चद्राप्रमाणे इतके सुदर दिसत होतें की जणूकाय ती सजीवनीच असून शुक्राचार्य उसणी मागण्यासाठी

आला आहे येथे शुक्राने संजीवनी उसणी मागण्याची कल्पना नाविन्यपूर्ण वाटते परंतु यानंतर पुढे दोन ठिकाणी रुक्मिणीच्या स्वरूपाचे वर्णन नरेंद्राने केले आहे ते ठराविक ठशाचे वाटते उदाहरणार्थ रुक्मिणीच्या कटाक्षबाणानी राजसभा शरपंजरी पडली ही कल्पना सभाप्रवेश या प्रसंगात पुनः नरेंद्राने निरनिराळ्या प्रकारानी सांगितली आहे वस्तुतः रुक्मिणीचे आगमन झाले त्यावेळी तिच्या स्वरूपाचे वर्णन नरेंद्रानें केले आहे आणि ते सुंदर साधले आहे त्यामुळे पुढील वर्णन अनवश्यक वाटते नरेंद्राच्या या वर्णनाच्या हौसेमुळे रुक्मिणीच्या स्वभावपरिपोषाकडे त्याने विशेष लक्ष दिल्याचे दिसत नाही याचे कारण कदाचित पहिल्या भागात वर्णनकौशल्य प्रगट करून पुढील प्रसंगात स्वभाववर्णनासारख्या कथारचनेच्या इतर अंगाकडे लक्ष देण्याचा त्याचा विचार असावा. प्रस्तुत ग्रंथावरून नरेंद्राची रुक्मिणी भागवत किंवा एकनाथाच्या रुक्मिणीसारखी धीराची आणि विचारशील राजकन्या वाटत नाही तिच्या भोवती नरेंद्राने आपल्या काव्यमय कल्पनाचे जाळे पसरून ठेविल्यामुळे प्राचीन संस्कृत काव्यनाटकातील शकुंतला सारख्या नायिकेची आपणाला आठवण होते सौंदर्यांत रंभाउर्वशीना लाजविणाऱ्या सख्याच्या मेळाव्यात रुक्मिणी राजसभेत प्रवेश करते त्यावेळी तिचे सौंदर्य पाहून सभेतील लोक मातीच्या चित्राप्रमाणे तटस्थ होतात भीमक तिला मांडीवर बसवितो आणि तांबूल देऊन आपल्या नखानी तिचे कुरळे केश सारखे करतो. नंतर कल्याणकीर्ति भाट आणि किन्नर यांचे सभेत आगमन झाल्यावर किन्नराच्या मुखाने ती स्वर्ग मृत्यु आणि पाताळातील राजाचे वर्णन ऐकते. या वर्णनात भारतातील निरनिराळ्या देशाच्या राजाचा कवीने समावेश

केला आहे हे सांगणे नकोच परंतु रुक्मिणीच्या मनाला एकहि येत नाही हे पाहून किन्नर कृष्णाच्या स्वरूपाचे आणि शौर्याचे वर्णन करतो ते ऐकून रुक्मिणीच्या सर्वांगात सात्विक भाव दाटतात परंतु नंतर ज्यावेळी वडील भाऊ रुक्मी हा कृष्णाची निंदा करून शिशुपालाला देण्याचे ठरवितो त्यावेळी अग्नीत सापडलेल्या कमलिनीप्रमाणे तिची अवस्था होते नरेंद्राने रुक्मिणीच्या विरहावस्थेचे केलेले विस्तृत वर्णन इतके काव्यमय आणि प्रतिभासंपन्न वाटते की प्राचीन मराठी वाङमयात भास्करभट्ट सोडल्यास दुसरा कोणताहि कवि नरेंद्राची बरोबरी करू शकेल असे वाटत नाही विरहाने रुक्मिणीला मूर्च्छा येते तेव्हा तिच्या सख्या तिला सावध करण्यासाठी निरनिराळे उपचार करतात परंतु रुक्मिणी सावध होण्याचे चिन्ह दिसेना तेव्हा तरुण सख्या तिच्या आईबापांना ही गोष्ट सांगावी असा विचार करतात त्यावेळी मात्र रुक्मिणी त्यांना तसे न करण्याबद्दल निक्षून सांगते भावकळणा सारखी शहाणी सखी रुक्मिणीचा हा विरहज्वर शमविण्यासाठी पाण्यावर धारा-दामोधर नावाचे बर्फाचे घर तयार करविते या धारा दामोधराच्या वर्णनावरून नरेंद्राला वास्तुकलेचे चांगले ज्ञान होते असे वाटते या हिमघरात जाण्यासाठी उठताना रुक्मिणीची जी अवस्था झाली तिचे वर्णन कवीने फार हळुवारपणाने केले आहे कवि म्हणतो "विरह-ज्वरे पान ऐसी कांपे पावो ठेविता पाताळ पळिपे ।। तेथ स्फटिकाची भोय लासावे तापे हे नवल काइ ?" अर्थात् विरहज्वर इतका वाढला होता की त्यामुळे रुक्मिणी चालताना पानासारखी कापत होती. जमिनीवर पाय ठेवल्याबरोबर खालचा पाताळ लोक त्या उष्णतेने जळत असे. तेव्हा अशा स्थितीत स्फटिकाच्या भूमीवर पाय ठेवताच ती भूमि

डागली जात असे यात नवल काय ? अशा अवस्थेत रुक्मिणीला सख्यांनी पालखीतून हिमगृहात आणिले आणि तिच्या करिता "कापुर केळिचा डोल्हारा केला तो मृणाळ—सुताचेनि पाटें विणिला । सोने—कमळाचा नळी लाबिला गोफू गुफौनिया ॥" अशा मृदु हिंदोळ्यावर तिला बसविले परंतु ह्या उपचारांनी देखील तिचा विरहताप शमेना, उलट जसजशी संध्याकाळ होऊन रात्र वाढू लागली तसतसा तिचा ताप वाढू लागला कवीने यावेळी संध्याकाळ, अंधार, दिवे, नक्षत्रे आणि चंद्रोदय यांची जी वर्णने केली आहेत ती इतकी कल्पनावैभवाने नटलेली आहेत की प्रत्येक रसिकाने नरेंद्राच्या प्रतिभाविलासाचे कौतुकच करावे उदाहरणा-दाखल पुढील संध्याकालीन अंधाराचे वर्णन पहा –

"तेथ फुटले इंद्रनिळाचे बोरे नेमा माथा उधविल्या आधारे । की डोंगर उन्मळीले गरुडोद्गारे पाचिचे हे की दाटत कस्तुरीयेचे मेघ माजिरे की पिल्ली पसरिली गगन-मार्गौरे ॥ की ब्रम्ह-गोळकु भरला पुरे कृष्णगंगेचेनि ॥

वरील वर्णनाप्रमाणेच कवीने सायकालीन कार्याचे वर्णन केले आहे त्या वर्णनातील पुढील भाग पहा –

"संकोचली कमळे पक्षिये टाकिती अविमाळ ।
चक्रवाके होनि व्याकुळे वीयोगे प्रियाचेनि ॥
नानाविद्धा फुलाचा आमोदी संग उधाति राज—बिदी
तेथ दाटत शृंगारियाची मादी पेठे फुल-सातेचा ॥
द्विजी सारिली संध्या—वदने शोडपोपचारी देवता-पुजने
अग्निहोत्रे केली उपासने मौने विसर्जली ॥
नगरीचा प्रासादी · मंगळ तुराचा शब्दी ।
पेखनेकाराचा मादी आकाश अवतरले

शृंगारु करौनि गणिका । उगाणा घेत कामुका ।
स्वैरिणीते नेति दूतिका । खाणेयासी ॥

वरील वर्णन नरेंद्राने विदर्भ नगरीतील नागरिकांच्या सायंकालीन कार्यांना अनुसरून जरी केले आहे तरीपण त्यावरून कवीपुढे महाराष्ट्राची तत्कालीन राजधानी देवगिरी आणि त्या नगरीतील संध्याकाळी होणाऱ्या नागरिकांच्या हालचालींचा अनुभव होता असे वाटते. कारण ढुंनवतूतांसारख्या प्रवाशांनी देखील या नागरिकांच्या रंगेलपणाचे अशा सारखेच वर्णन केले आहे.

परंतु ह्या सर्वांपेक्षा नरेंद्राने चंद्रोदयाचे केलेले वर्णन फारच सरस झाले आहे.

"ऐसा उदयाचळिचा उपरवाळा । उपटडु जाला चंद्र-मंडळा ।
जैसी रामी जाली गगनाचा खळा । चकोरा पिकाची ॥
कीं चांदिणेयाचा समुद्र । तेथ निगत लक्ष्मी-मुखचंद्र ।
कीं कृष्णालागि धाडिनाये इंद्र । पांडु अमृताचा ॥
कीं गगन-मंडपी चंद्रिका-वेली । नक्षत्रांची फुलें लागली ।
कीं अमृताचेनि विजें विरूढली । आकारे चंद्राचेनि ॥
कीं आकाशाचिये वोप-आंतु । कल्पामु असे प्रतिबिंबतु ।
कीं मन्मथ-नाथाचा गुढरू-श्वेतु । कापडिला खीरोदकें ॥
कीं घेउनि सिद्ध-रसाची उटी । यकाकी जिणावया धूर्जटी ।
काम पालोनि गगनाचा हटी । कुसुमायुधु हा ॥

परंतु चंद्रोदयामुळे रुक्मिणीची विरहावस्था जास्तच वाढली. तेथे असलेल्या द्राक्षमंडपाला चंद्रकरांमुळे शोभा आली. नरेंद्राने या शोभेचे व रुक्मिणीच्या तगमगीचे सुंदर वर्णन केले आहे. त्या वर्णनात चकोर, चक्रवाक, राजहंस, कोकिळा, आणि साळुंक्या

या ठराविक पाखराना अवेळी कवीने ओढून आणिले आहे हे संस्कृत कवीचे अनुकरण आहे हे उघड आहे. परंतु रात्री कोकिळा आणि साळुंक्या डोळे उघडे ठेवून कसा काय मधुर नाद घालतात हे समजत नाही सख्या विरहोपचाराकरिता निरनिराळे थंड पदार्थ आणतात त्याची लांबलचक यादी कवीने दिली आहे ती थोडी कंटाळवाणी वाटते इतकेच नव्हेतर पुढील वर्णनहि बरेच लांबले असून पुनरुक्त झाले आहे

हा पुनरुक्तीचा दोष या विरहवर्णनातहि आढळून येतो उप-चाराचे वर्णन दोन तीन ठिकाणी आलेले आहे सख्या चिंतातुर होऊन रुक्मिणीला आपले मनोगत सांगण्यासाठी आग्रह करतात तेव्हा ती कंठी प्राण धरून सांगते अर्थात् हे सांगताना तिला फार आयास होतात, लाज वाटते आणि सागू किंवा नको अशी तिची दोलायमान स्थिति होते तिच्या मनातील भाव भावकळणा या चतुर सखीला जेव्हा समजतो तेव्हा रुक्मिणीचा शिक्षागुरु सुदेव ब्राह्मण याची कृष्णाला निरोप पोचविण्यासाठी योजना करावी असे ती रुक्मिणीला सुचविते सुदेवाजवळ रुक्मिणी जी पत्रिका देते ती भागवताप्रमाणे नसते ह्या पत्रिकेत रुक्मिणी किन्नराने केलेल्या रूपगुणाच्या वर्णनाचा उल्लेख करते माझ्या सारख्या चंद्रकलेला शिशुपाळ हा राहू गिळू पाहत आहे त्याचे तोंड फाडून माझे रक्षण कर अशी कृष्णाला विनंती करते मूळ भागवतात यापेक्षा किती तरी विविध प्रकारानी निरनिराळी कारणे देऊन रुक्मिणीने कृष्णाला येण्यासाठी विनविले आहे इतकेच नव्हेतर कुळदेवी यात्रेच्या निमित्ताने अंबालयाच्या वाटे-वर हरण करण्याचा उपाय देखील तिने कृष्णाला [illegible] सूच-

विला आहे परतु नरेंद्राला विरहवर्णनाखेरीज दुसरी गोष्ट महत्वाची वाटत नाही असे पत्रिकेतील विरहाच्या उल्लेखावरून दिसते सुदेवाची पाठवणी करताना रुक्मिणी त्याला विडा देते त्यावेळी "हाती जाळु निगाला तेणे हृदयीचा देवो वोवाळिला मगळमूर्ति म्हणौनिया अशी तिची विरहामुळे अवस्था होते यातील हृदयीच्या देवाला ओवाळण्याची कल्पना मोठी आल्हाद-दायक वाटते

रुक्मिणीच्या स्वरूपाचे आणि विरहाचे नरेंद्राने केलेले वर्णन एकनाथाच्या काव्यात आढळत नाही नाथाची वर्णन कर–ण्याची दृष्टिच निराळी आहे रुक्मिणीचे स्वरूप आणि गुणवर्णन करण्यासाठी त्यानी अध्यात्माच्या दृष्टिकोनातून पाहिले आहे त्याची रुक्मिणी कनकाला जशी कांति अथवा सूर्याला दीप्ति तशी कृष्णाची शक्ति आहे ब्रम्हदेवाने रुक्मिणीला निर्माण केले नाही असे नाथ सागतात तर त्याची रुक्मिणी" कृष्णप्रभवे रूपासी आली । बरवेपणा सीग चढली । साकारली सौदर्ये" कृष्णाच्या प्रभावाने रुक्मिणी जशी रूपाला आली तसेच तिच्या मस्तका-वरील केशाची उत्पत्ति नाथानी "गगन शून्यत्वा उबगले । कृष्ण भेटीसी उदित जाहले । भीमकी मस्तकासी आले । नीलालकी शोभत । अशी दिली आहे आकाशाला आपल्या शून्यपणाचा कटाळा आला, ते कृष्णभेटीसाठी उत्सुक झाले म्हणून त्याने रुक्मिणीच्या मस्तकावरील केशाचे रूप घेऊन आपली इच्छा तृप्त केली असे नाथानी अलकारिक भाषेत रुक्मिणीच्या केशाचे वर्णन केले आहे. मुख आणि इतर अवयवाचे वर्णन करताना देखील त्यानी हीच पद्धति स्वीकारली आहे, " भीमकीमुखी निष्कलक । क्षयातीत पूर्णशशाक । कृष्णप्राप्तीसी मयक । भीमकी

मुखी उगवला ।'' असे त्यानी मुखाचे वर्णन करून पुढे ''भीमकी थोर कपाळाची । कृष्णदेवे ते देवाची । निढळी प्रभा श्यामतेची । तोचि कस्तुरी मळवट ।। असे कपाळाचे वर्णन केले आहे

''कृष्ण पहावया जगजेठी । भोवई साडिली व्यकटी ।
कृष्णी मीनलीया दिठी । सहजगाठी सुटली '' ।।

याप्रमाणे अवयवाचे कृष्ण-मय वर्णन करूनच नाथ थाबले नाहीत तिच्या अगावरील दागिन्याचे देखील वर्णन करताना असाच प्रकार झाला आहे उदाहरणार्थ पुढील वर्णन पहा –

''मुक्त नाव मुक्ताफळा । नेणती मुक्तीचा जिव्हाळा ।
म्हणोन पडली भीमकी गळा । भेटी गोपाळा माळ झाली ।।
शमदमाची सुभटे । हस्तकडगे बाहुवटे । करी ककणे उद्धटे
कृष्णनिष्ठे रुणझुणती ।।

वरील वर्णनावरून नाथानी आपली कवितावधू अध्यात्म आणि कृष्णभक्ति याच्या आवरणानी कशी झाकून टाकली आहे याची सहज कल्पना करता येईल वर्णन करताना नाथ रूपकाची सुदर योजना करतात परतु बहुधा ह्या वर्णनावर अध्यात्माची दाट छाया पडल्यामुळे काव्याचे रजकत्व कमी होऊन वाचकाला त्याच त्या कल्पना पाहून पुढे कटाळा येतो, वास्तविक मूळ भागवत हे आख्यानपर आहे, भगवताची अवतारकृत्ये अद्भुततेच्या सदरात पडतील अशा स्वरूपात बऱ्याच ठिकाणी वर्णिलेली आहेत परतु पदोपदी त्या कथानकावर नाथाप्रमाणे अध्यात्माचा हात फिरविण्यात आला नाही उलट कृष्णचरित्र इतक्या रसाळपणाने वर्णिलेले आहे की आजहि हजारो श्रोते मोठ्या आवडीने आणि भक्तिभावाने त्याचे श्रवण करतात याचे

कारण त्यात स्वाभाविकतेचे सूत्र सुटलेले नाही नाथ आपल्या काव्यात मानवी भावना चित्रित करताना अध्यात्माच्या नादी लागून कथानकाच्या ह्या प्रमुख अगाकडे कमी लक्ष देतात त्यामुळे त्याच्या काव्याचा प्राण गुदमरून गेल्यासारखा वाटतो परतु नरेंद्राप्रमाणे कल्पनेच्या प्रवाहात फारसे न सापडता त्याची लेखणी मूळ कथानकाबरोबर धावत सुटते रुक्मिणीचे स्वभाव वर्णन करताना देखील त्यानी हा दृष्टिकोन पुढे ठेविला आहे म्हणूनच त्याची रुक्मिणी नरेंद्राप्रमाणे गधर्व नगरीत विहार करणारी नायिका न वाटता वास्तवतेच्या मर्यादा साभाळून वागणारी एक राजकन्या वाटते राजसभेत कीर्ति नावाच्या ब्राम्हणाने कृष्णाच्या स्वरूपाचे आणि शौर्याचे केलेले वर्णन ऐकून तिचे प्रेम कृष्णावर बसते परतु वडीलभाऊ रुक्मी हा कृष्णाची निदा करून शिशुपालाशी तिच्या विवाहाचा वाङनिश्चय करतो, त्यावेळी तिची अवस्था फार असाह्य होते " कवण उपासू गे देवता । कवण कवण्या जाऊ तीर्था । कवण नवस नवसू आता । कृष्णनाथ प्राप्तीसी ' असा स्त्रीस्वभावसुलभ विचार तिच्या मनात येतो आपली आई अथवा मैत्रिणी याना आपले हितगुज सागू नये असे तिला वाटते कारण आई रडण्याखरीज दुसरे काय करू शकणार ? आणखी शिवाय ही गोष्ट वडील बधूच्या कानापर्यंत जाईल तेव्हा धैर्य धरून स्वत च या सकटाला तोड देण्याचा ती निश्चय करते आणि आपल्या विश्वासाचा सुदेव ब्राम्हण याला पत्रिका देऊन कृष्णाकडे पाठविते लग्न घटका जसजशी जवळ येते तसतशी तिची काळजी वाढते. कारण कृष्ण येण्याचे चिन्ह तिला दिसेना माडीवर जाऊन कृष्णाची ती वाट पाहू लागली. कृष्णाला विषयाची गोडी नसताना उगीच आपण

पत्रिका लिहिली असे तिला वाटू लागले अथवा आईबापाना न विचारता पत्रिका लिहिते तेव्हा 'ही किती ढालगज स्त्री आहे' असे कृष्णाला वाटले असेल म्हणून त्याने येण्याचा बेत रहीत केला असावा अशी तिला शका आली अशा प्रकारच्या शका कुशकानी तिच्या मनाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली ती तहानभूक विसरली तिला अन्न गोड लागेना स्वत च्या दुर्भाग्याला दोष देऊन ती रडू लागली विजनवारा आणि चदनादि शीतल पदार्थ तिला तापदायक वाटू लागले अशा विकल स्थितीत सुदेव ब्राम्हण परत येऊन तिची भेट घेतो आणि तिला कृष्णाच्या आगमनाची आनदाची बातमी सागतो त्यावेळी तिचा आनद गगनात मावेना "आगीची उतटली काचोळी । मुद्रिका दाटली आगोळी। सर्वांगे हरिखेली वेल्हाळी। जीवे वोवाळी द्विजाते" अशी तिची आनदमय स्थिति झाली ज्या ब्राम्हणाने श्रीकृष्णाला आणिले त्याच्या उपकाराची फेड अशक्य आहे असे तिला वाटले दुसरे दिवशी ती अबिकेची पूजा करण्यासाठी मदिरापर्यंत मोठ्या परिवारासह पायी चालत जाते देवीची ती षोडशोपचारे पूजा करते आणि कृष्णनाथ आपल्याला वर मिळावा अशी ती देवीची प्रार्थना करते पूजा संपल्यावर मदिरातून बाहेर येते त्यावेळी शत्रु पक्षांतील चैद्यमागधादि राजे तिचे अलौकिक सौदर्य पाहून कामबाणानी मूर्च्छित होतात "माझी अभिलाषिती जननी । म्हणोनि विंधिले कामबाणी । वीर पडिले धरणी । कामबाणी मूर्च्छित ।।" अशी या वीराच्या मूर्च्छित होण्यासबधाने नाथमहाराजानी सुदर कल्पना केली आहे दोन्ही दळातील वीरामध्ये घनश्याम कृष्णाला ती पाहते स्वत श्रीकृष्णच तिच्या जवळ येतो त्यावेळी ती प्रेम असून घाबरते आणि आपल्या

हातातील माळ मोठ्या आवडीने कृष्णाच्या गळयात घालते कृष्ण तिला आपल्या रथावर घेतो हे पाहून यादव सैन्यात जय-जयकार होतो, आणि देव आकाशातून पुष्पवृष्टि करतात परतु रुक्मीला मात्र हा प्रकार पाहून राग येतो मागधादि राजे "धैर्य गाभीर्य वैभव । यश कीर्तीची राणीव । नेली सर्व यादवी ।" असे म्हणून स्वत चा धिक्कार करतात गवळयाने आमचे यश हरण केले आता येथून परत जाणे बरे नाही असे त्याना वाटले ते निर्वाणीचे युद्ध करण्याचा निश्चय करतात युद्ध सुरू झाल्यावर मात्र रुक्मिणीला फार भीति वाटते कारण या युद्धात दोन्ही पक्षातील वीर पडतील "देखोनि वैरियाचा वरबळा । काणिन्नली भीमकबाळा । नाश होईल दोही कुळा । बोल कपाळा लागेल ।। देर भावे पडतील रणी । सासुरा होईल टेहणी । कैची आणली हे वैरिणी । धड कोणी न बोलती" असे तिला वाटले त्याच प्रमाणे सखेबधु जर युद्धात पडले तर आईला फार दु ख होईल आणि त्यामुळे माहेर तुटेल अशी तिची 'इकडे आड तिकडे विहीर' सारखी असाह्य अवस्था झाली या सकटातून मुक्त होण्यासाठी तिला एकच मार्ग दिसला तो म्हणजे कृष्णाची कृपा तिने भया-कुल नजरेने कृष्णाकडे पाहिले तेव्हा कृष्णाने हासून तिला अभय-वचन दिले नतर रुक्मीचा पराभव करून कृष्ण त्याच्या गळयात आपले धनुष्य घालून त्याला मारण्यासाठी जेव्हा ओढतो तेव्हा देखील रुक्मिणी कृष्णाच्या पाया पडते आणि "कृपाळु वा जगन्नाथा । यासी सर्वथा न मारावे" अशी आपल्या भावाला जीवदान देण्यासाठी कृष्णाची करुणा भाकते यावरून नाथानी रुक्मिणीचे स्वभाववर्णन किती सहृदयतेने केले आहे याची वाचकास सहज कल्पना होईल. स्त्रिया जात्याच कोमल मनाच्या

असतात लग्न झाल्यावरहि आईबाप, बहीणभाऊ याचे प्रेमपाश त्याना तोडवत नाहीत तसेच नवऱ्यावरील प्रेम आणि त्याच्या घरांतील वडीलधारी मासूमासऱ्यासारखी नात्याची माणसे याची मर्जी सभाळण्यासाठी होणारी नववधूची धडपड इ गोष्टी नाथासारख्या ससारदक्ष कवीच्या नजरेतून कशा सुटतील ? मूळ ग्रथात रुक्मिणीच्या स्वभावातील नाथानी वर्णिलेली वैशिष्टे आढळत नाहीत यावरून रुक्मिणीचे स्वभावचित्रण करण्यात नाथानी स्त्री स्वभावातील कोमल भावना विशद करताना बरीच मार्मिकता प्रकट केली आहे

अशा प्रकारचे स्वभाववर्णनकौशल्य इतर पात्राच्या बाबतीत आढळून येत नाही कथेचा नायक श्रीकृष्ण याच्या स्वरूपाप्रमाणे स्वभाववर्णन साधलेले दिसत नाही कृष्णाच्या श्यामलकातीचे वर्णन करताना 'पिवून इद्रनीळ किळी । वोतली कृष्णतनू सावळी । पाउले सुकुमार कोवळी । घोटी निळी दोही भागी'' अशी इद्रनील मण्याची नाथानी सुदर योजना केली आहे. तसेच मुखाचे वर्णनहि "उपमे चद्रकळा हीन । तो तव कृष्णपक्षी क्षीण । उदय अस्तावीण सपूर्ण । वदनेदु श्रीकृष्णाचा" या प्रमाणे व्यतिरेक अलकाराने करून नाथानी कौशल्य प्रकट केले आहे पण यापेक्षाहि कृष्णाच्या कबरेचे वर्णन जास्त सुदर झाले आहे "अतिशयेसी माज साना । होता अभिमान पंचानना । देखोनि श्रीकृष्ण मध्य रचना । लाजोनि राना तो गेला'' अशी त्यानी सिहकटीशी तुलना करून प्रतीप अलकार साधला आहे स्वरूपाप्रमाणे कृष्णाच्या अगावरील दागीन्याचे नाथानी अलकारिक भाषेत वर्णन केले आहे परतु या

वर्णनात नाथाची अध्यात्माची छटा देण्याची हौस प्रकट होते उदाहरणार्थ पुढील वर्णन पहा –

कृष्णचरणीचेनि भूषणे । वाकीने वेदासी आणले उणे ।
ते तव धरून ठेले मौने । कृष्णकीर्तने हे गर्जे ।।
पूर्वोत्तर मीमासा दोनी । कुडले जाहली कृष्ण श्रवणी
ती उपनिषदार्थ कीरणी । झळकताती सतेज

येथे नाथानी कुडलाचे पूर्वोत्तर मीमासाबरोबर जे साम्य दाखविले आहे त्यावरून त्यानी ज्ञानेश्वरीतील गणेशशारदास्तवनातील कल्पनाचे अनुकरण केले आहे असे दिसते यानतर नाथानी कृष्णाचे कुडिनपुरात झालेले आगमन आणि त्याचे भीमकाने केलेले आदरातिथ्य हा प्रसग वर्णन केला आहे रुक्मिणीच्या पत्रिकेवरून कृष्ण कुडिनपुराला आला नगरात बिऱ्हाड केल्यास शिशुपालाशी व्यर्थ भाडण होईल असे निमित्त सागून मोठ्या युक्तीने अबालयाजवळ जानवसा देण्यास भीमकास त्याने सागितले भीमकाने ती गोष्ट मान्य करून कृष्णाला नगरामधून समारभाने जाण्यास विनति केली कृष्णाला पहाण्यासाठी नागरिकाची जी धादल उडाली त्या गडबडीचे नाथानी सुरेख वर्णन केले आहे. इतकेच नव्हे तर चोखदळ वृत्तीच्या नरनारीनी नोवरा या दृष्टीने शिशुपालाशी तुलना करून कृष्णाची प्रशसा केली आहे त्या सबधाने नाथ सागतात –

"बोलती नरनारी सकळा । काल मिरविले गे शिशुपाळा ।।
न देखो नोवरपणाची कळा । नाही जिव्हाळा लग्नाचा ।।
कृष्ण नोवरा भीमकी लागी ।" यावरून नाथाचे जनमनाचे निरीक्षण किती मार्मिक होते हे समजते नाथ हे कृष्णभक्त असल्यामुळे प्रस्तुत कथाप्रसग रचण्याला त्याची ही कृष्ण

भक्ति कारणीभूत झाली हे उघड आहे परतु रुक्मिणीचे स्वभाव-वर्णन करण्यात त्यानी जी सहृदयता आणि मार्मिकता प्रकट केली आहे तो प्रकार कृष्णाच्या स्वभाववर्णनात आढळून येत नाही. हरिवशात कृष्णाने रुक्मीचा पराभव करून त्याचे हृदय फोडले असा उल्लेख आहे मूळ भागवतात रुक्मीला कृष्णाने विरूप केले असे वर्णन आहे नाथानी आपल्या ग्रथात भागवताचे या बाबतीत अनुकरण केले आहे परतु कृष्णाच्या उदारपणासबधाने नाथानी "जे न दे देवकी यशोदेसी। ते गती दिधली पूतनेसी। समान येणे अरि मित्रासी। उदारतेसी काय वानू" असे जे वर्णन केले आहे' त्या वर्णनाशी रुक्मीचे "अर्ध खाड अर्ध मिशी। पाच पाठ काढिले शिसी। विरूप केले रुक्मयासी। गळा रथेसी बाधिला" अशा प्रकारची विटबना करणे जरा विसगत वाटते आणि त्याहिपेक्षा रुक्मीणी आपल्या भ्रात्याकरिता दीनवदन होऊन जीवदान मागत असता "पाहे बधूचे वदन। वेगे करी निबलोण" असे तिला कृष्णाने उत्तर देणे चमत्कारिक दिसते तसेच कृष्णाच्या हाताने आपल्या मुलाचे विरूपकरण झालेले ऐकून रुक्मिणीच्या बापाला सतोष होतो असे नाथानी सागितले आहे तेहि स्वाभाविक वाटत नाही

या दृष्टीने नरेद्राने केलेले कृष्णाच्या स्वरूपाचे वर्णन बरेच काव्यमय वाटते अगकातीचे वर्णन करताना नरेद्र म्हणतो –

कैसी सावळी सर्वांगे तेजे इद्रनिळाते म्हणेति उगे ॥
आगिचेनि प्रेमे लक्ष्मी वोळगे नीळोत्पळाची "

यातील इद्रनीळाशी दाखविलेल्या साम्याची कल्पना नाथानी देखील आपल्या वर्णनात दिली आहे परंतु या खेरीज कृष्णाच्या

इतर अवयवाचे नरेंद्राने जे वर्णन केले आहे ते सुंदर झाले असून अभिनव कल्पनानी नटलेले आहे उदारणार्थ पुढील वर्णन पहा

देवरायाचे देखौनि मुखवटे कृष्णपक्षी चंद्र दिहा– दिहा तुटे ॥
तेवीचि लाजा हिये फुटे मिसे कळाचेनि ॥
श्रीकृष्णाचिया कटाक्ष धारसा पडत वेधाचा वळसा
तेथौनि निगावा नाही मानसा मुनेश्वराचिया
रूप रत्नाते घे वरिव देखौनि पशुपक्षिये होति लेपिव
ते कवणा वाखाणे बरव जयाचा नामीचि वेधु.

वरील वर्णनात कृष्णाचे सुंदर मुख पाहून वद्य पक्षात चंद्राचे तेजोहीनतेने क्षीण होणे, अथवा लाजेने चंद्राचे हृदय कलाक्षयाच्या रूपाने फुटणे ही उत्प्रेक्षा तसेच नंतरच्या ओवीतील रत्नापेक्षा कृष्णाचे सौदर्य श्रेष्ठ असून ते पाहणारे पशुपक्षी चित्राप्रमाणे तटस्थ होतात, ही कल्पना आल्हाददायक असून तीवरून कवीची सौदर्यदृष्टि बरीच मार्मिक आहे असे वाटते कृष्णाच्या स्वरूपसौदर्याप्रमाणे त्याच्या प्रतापाचेहि नरेंद्राने वर्णन केले आहे कवि म्हणतो –

'जयाचेनि प्रतापे खरागले होका गगन काजळैले
सूर्यासि तीव्रपण आले तेणे तापे ॥

म्हणजे कृष्णाचा प्रतापग्नि इतका तीव्र होता की त्यामुळे आकाश भाजून काळे झाले आणि सूर्याची उष्णता प्रखर झाली याप्रमाणे निरनिराळ्या अलंकाराची योजना करून नरेंद्राने वर्णनाला शोभा आणली आहे. स्वरूप आणि प्रताप वर्णनाप्रमाणे कवीने कृष्णाच्या स्वभावाच्या वर्णनाकडे लक्ष दिले नाही, कारण प्रस्तुत ग्रंथात कृष्णाच्या स्वभावावर प्रकाश टाकणारा एखादा प्रसंग

कवीने वर्णन केल्याचे आढळत नाही कदाचित् पुढे तसे केले असावे याप्रमाणे रुक्मिणी आणि कृष्णाच्या स्वरूपवर्णनात श्रीएकनाथ आणि नरेंद्र यानी आपापले कौशल्य प्रगट केले आहे दोघेहि कृष्णाचे भक्त असूनहि कृष्ण चरित्राकडे पाहाण्याचा प्रत्येकाचा दृष्टिकोण भिन्न असल्यामुळे वर्णनात अंतर पडणे साहजिक आहे नरेंद्राची भक्ति त्याच्या प्रतिभाविलासाच्या आड येत नाही याच्या उलट काहीसा नाथाच्या कवित्वाचा प्रकार आहे त्याची दृष्टि बोधप्रधान आहे परंतु रुक्मीच्या स्वभाव वर्णनात दोघाची बरीच एकवाक्यता दिसते हे पाहून आश्चर्य वाटते हरिवंशात रुक्मी हा कृष्णाचा कंसवधामुळे द्वेष करीत होता असा उल्लेख आहे भागवतकारानीहि रुक्मीचे कृष्णाशी वैर होते असे सागितले आहे परतु नाथानी कृष्णभक्तीने प्रेरित होऊन रुक्मी कृष्णाची निंदा करीत असताना त्याच्या तोंडी व्याजस्तुति म्हणजे वरून निंदा परंतु पर्यवसानी स्तुति घातली आहे हे मानवीस्वभावधर्माच्या विरुद्ध आहे. यासबधी नाथाच्या पुढील ओव्या पहा —रुक्मी म्हणतो

कृष्णासी सोयरीक नये कामा । हे काय कळले नाही तुम्हा ।
सखा मारिला अहं मामा । तो काय आम्हा धड होईल ॥
कृष्ण नव्हे जी स्वतंत्र । भक्त परतंत्र सदाचा ॥
कृष्ण अतीत चहू वाचा । तेथे वाङ्निश्चयो घडे कैचा ॥
प्रकृतिपुरुषा पाणिग्रहण । माझेनिजाण होतसे ॥" इत्यादि

हे वर्णन वेदांताच्या उपदेशात कदाचित शोभून दिसेल परंतु एका आख्यान काव्यात त्यामुळे रसहानि होते याची जाणीव नाथानी भक्तीच्या भरात ठेविली नसावी असे वाटते कारण नाथ स्वत च "रुक्मिया कृष्ण निंदा करित । वाग्देवता

स्तुति वदत। निंदेशी वागेश्वरी भीत। पाप अद्‌भुत निंदेचे ।। असे या निंदागर्भस्तुति सारख्या विसंगत वर्णनाचे समर्थन करतात

नाथाप्रमाणे नरेंद्रानहि रुक्मीच्या कृष्ण निंदेचे काही स्थळी अशाच स्वरूपाचे वर्णन केले आहे रुक्मी म्हणतो –

"तया जाति ना कुळ अनोळखी नेणो मायबापु वाढविला गौळी।
वायाचि ठसा चढविला गोवळी माणूस-पणाचा ।।
तो वेद-शास्त्रा वेगळा स्वरूपे । निर्गुणु काळा ऐसा रूपे
मामा येकु मारिला सापे । घरिचा घरी

नरेंद्राचा ग्रंथ अपूर्ण स्वरूपात प्रसिद्ध झाला आहे, तरीपण त्यावरून नरेंद्राच्या रचनाकौशल्याचा प्रत्यय अशाहि स्वरूपात प्रत्येक प्रसंगातून येतो कालिदासाने आपल्या शाकुंतल नाटका-करिता महाभारतातील एक साधा प्रसंग निवडिला आहे परंतु आपल्या अलौकिक प्रतिभेने त्या निर्जीव प्रसंगातून त्याने एक जिवंत कलाकृति निर्माण केली अनेक चित्ताकर्षक प्रसंग स्वत -च्या कल्पनाशक्तीने निर्माण करून त्याने मूळच्या लोखंडाचे सोने केले नरेंद्राने देखील ह्या थोर संस्कृत कवीचे अनुकरण करून आपले काव्य रचिले असावे असे त्याच्या निरनिराळ्या वर्णना-वरून वाटते भागवत ग्रंथातील रुक्मिणीहरण या कथेचा आपल्या काव्याला आधार घेऊन त्याने कित्येक प्रसंग आपल्या प्रतिभेने निर्माण करून मूळच्या साध्या कथेला एका महाकाव्याचे लेणे चढविण्याचा प्रयत्न केला आहे. अशा प्रसंगा पैकी किन्नराच्या उपाख्यानाचा मागेच उल्लेख केला आहे. या किन्नराने आपल्या अलौकिक मधुर गायनाने जंबुद्वीपातील पूर्व पश्चिम दक्षिण आणि उत्तर या प्रदेशातील राजाचे गुणवर्णन केले आहे ही राजाची नांवे नरेंद्राने महाभारतातून घेतली

असावीन असे डॉ कोल्ने याचा तर्क आहे परतु त्यावरून कालिदासादि सस्कृत महाकवीच्या स्वयवर वर्णनाप्रमाणे नरेद्राने आपल्या काव्यात त्याची योजना केली असावी असे वाटते दुसरे असे की, हे राजाचे वर्णन किन्नरमुखाने गायनाच्या द्वारे करवून नरेंद्राने आपल्या गायन कलेतील ज्ञानाची वाचकाना माहिती करून दिली आहे विशेपत यादवकालीन महाराष्ट्रात गायनाचा कोणता प्रकार रूढ होता हे समजण्यास नरेद्राने निरनिराळ्या रागाची आणि तालाची जी नावे दिली आहेत त्यावरून अदाज करता येतो

प्राचीन महाकाव्याचा दुसरा एक विशेप म्हणजे सृष्टि वर्णनाची योजना हा होय या दृष्टीने नरेद्राची सृष्टिवर्णने सरसच ठरतील या सृष्टिवर्णनापैकी सायकाल आणि चद्रोदयाच्या वर्णना-सबधाने मागे माहिती दिली आहे त्याखेरीज द्वारकेच्या परिसरातील वनोपवनाचे, वसताचे आणि वृक्षाचे अशी विस्तृत वर्णने नरेंद्राने आपल्या काव्यात दिली आहेत त्यावरून कवीचे सृष्टिनिरीक्षणकौशल्य तर दिसतेच पण त्याखेरीज आख्यान काव्याच्या सौदर्यात वाढ होते उदाहरणार्थ पुढील वसताचे वर्णन पहा –

ना ना ते सूदर्याचे राहाण की सभोग सुखाचे साजवण
की ते अनगाचे पालाणले साहाण त्रिनेत्रावरि
की तो काम–तत्त्वाचा सर्वदा विन-रागाते आणीतुसे ददा
अखड जैत दे प्रमदा सग्रामी सुरताचा

की ते संभोग– सुखाची दिवाळि विरहणी धेढेवाळिया होती काजळी
जित–इद्रिये हारवीति तिये वेळी । जू वैराग्याचे

रस आणि अलंकार हे काव्याचे दोन प्रमुख घटक आहेत त्यापैकी रसनिष्पत्तीचे कार्य भावनेच्या द्वारे होते काव्याचा विषय आत्मनिष्ठ असेल म्हणजे कवीच्या स्वत च्या अनुभूतीतून त्याप्रसगाची निर्मिति झाली असेल तर अलकाराच्या योजनेवाचून-हि तो कवि तरलभावनेच्या साहयाने आपल्या काव्यात रसाविष्कार करू शकतो अर्वाचीन भावगीते ही अशा प्रकारच्या काव्याचे उदाहरण म्हणून देता येईल परतु आख्यानकाव्यात आत्मानु-भवाला तितका अवसर मिळत नाही अशावेळी लेखकाची कल्पना शक्ति व्यापक नसेल तर समर्पक अलकाराची योजना करून त्याला आपली कलाकृती चित्ताकर्षक करता येणार नाही नरेंद्राने या गोष्टीची जाणीव ठेवून आपल्या काव्याला या दोन्ही अगाची जोड दिली आहे रसोत्कटतेच्या दृष्टीने रुक्मीणीची विरहावस्था ह्या प्रसगात नरेद्राने आपले कौशल्य उत्तम रीतीने प्रगट केले आहे तसेच नरेद्राचे कल्पनावैभव जागजागी त्याने आपल्या प्रसगवर्णनात समर्पक अलकाराची जी योजना केली आहे त्यावरून कळून येते या अलकारापैकी रूपक, उत्प्रेक्षा, उपमा आणि अपन्हुति याचा नरेद्राने जास्त प्रमाणात उपयोग केला आहे विशेषत रूपक आणि उत्प्रेक्षेवर त्याने जास्त भर दिलेला आहे नरेद्र अलकाराची योजना करताना इतर सतकविप्रमाणे प्रस्तुत विषय सुगम करुन सागण्याच्या दृष्टीने त्याना व्यावहारिक उदाहरणाचे स्वरूप न देता कविप्रतिभानिर्मित असे काव्यातील अलकाराचे स्वरूप देतो त्यामुळे त्याच्या काव्यरचनेला विशेष रजकत्व आलेले आहे. नरेद्राने योजिलेली रूपके साग पेक्षा निरग आणि मालास्वरू-पातच जास्त आढळतात ज्ञानेश्वराप्रमाणे सातव्या

अध्यायातील मायानदीचे रूपक, सोळाव्या अध्यायातील गुरूवर केलेले चित्सूर्याचे रूपक किंवा अठराव्यातील गीताप्रासादाचे रूपक नरेंद्राच्या काव्यात आढळत नाही उपवनाच्या वर्णनात नरेंद्राने वसतावर पुरुषाची कल्पना करून सुदर रूपक साधले आहे परतु ज्ञानेशाप्रमाणे साग समस्तवस्तुविषय रूपकाचे कल्पनावैभव त्यात दिसत नाही तथापि निरग रूपकाचा नरेंद्राने फार मोठ्या प्रमाणात उपयोग केला आहे उदाहरणार्थ –दान–मदाकिनी, साहित्य–सृष्टीचा चाळकु, सारस्वत–गगेचा त्रियबकु कीर्ति–चद्र, कविता–कामिनी, लावण्य–मृगाचे पाडस, शृगार-विहिगू, गगन–सरोवरिचे राजहस इत्यादि यावरून नरेंद्राची उपमाने विविध प्रकारची असून त्याची योजना समर्पक झाली आहे. निरगाप्रमाणे मालास्वरूपातहि बऱ्याच प्रमाणात रूपकाची नरेंद्राने योजना केली आहे. उदाहरणार्थ पुढील ओव्या पहा –

कटाक्ष–सरोवरी उलळत देवीचे नयन–मासे तळपत
ते आडिविया कातरी भेदित जिव्हार कामुकाचे
आवडिचा आवर्ती पडत सिहाणिवेचे तारु नळु घेत
उत्कठेचेनि पतगे माल्हवत कुळेवा जाणिवेचा
चाडेचे आबूठ चढले तेणे चातुर्याचे चादिणे लोपले ॥

वर दिलेल्या उदाहरणात परपरित रूपकाचा प्रकार दिसून येतो. तरीपण मालास्वरूपाची योजना नरेंद्राने पुष्कळ ठिकाणी सुदरतेने केली आहे अलकाराची रचना करताना नरेंद्राच्या प्रतिभेचा एक विशेष असा आहे की, बऱ्याच स्थळी त्याचा सकर झालेला आढळून येतो आणि हा सकर रूपक आणि उत्प्रेक्षा या दोन अलकारातच जास्त प्रमाणात झाला आहे उदाहरणार्थ पुढील रुक्मिणीच्या सख्याचे वर्णन पहा –

की चंद्र–सरोवरिचिया यक्षिणी की अमृताचिया विनी
की मूर्तीसि आलिया जिनी डोळेयाचिया
की लावण्य–लोकिचिया विद्याधरा की सुख–स्वर्गिचिया अप्सरा
ना ना ते अवयेव निगाले हाथियेरा अनंगाचिया, अप्सरा।

यात रूपकाची योजना मालास्वरूपात करून सुंदर उत्प्रेक्षा अलंकार साधला आहे चंद्रसरोवर, लावण्यलोक, आणि सुख–स्वर्ग या रूपकाची, तसेच पुढील उत्प्रेक्षेची उदाहरणे पहा –

" की घेउनि सिद्ध–रसाची उटी यकाकी जिणावया धूर्जेटी
कास घालौनि गगनाचा हटी कुसुमायुध हा
की द्यावा–पृथ्वीयेचा पोकळी कापुराची मोवाळी।
की गगन लेइले कडियाळी मृणाळाची

त्यापैकी पहिल्या ओवीत चंद्रावर मदनाचा आरोप करून तो शिवाला जिंकण्यासाठी निघाला आहे अशी कल्पना केली आहे रूपक उत्प्रेक्षेच्या मानाने इतर अलंकार कमी प्रमाणात आढळून येतात, तथापि अपन्हुति आणि उपमा याची योजना कवीने समर्पक रीतीने केली आहे उदाहरणार्थ पुढील अपन्हुति पहा –

की द्राक्ष–मंडपु नव्हे मेहुडे वरिखत नवरसाचे वाकडे
की अनंगाची सुटेति नळकाडे विरहिणीवरी

हा द्राक्षमंडप नसून नवरसाचा वर्षाव करणारा मेघ आहे अथवा विरहिणीवर मदनाने सोडलेल्या पिचकाऱ्या आहेत अर्थात मंडपावर मेघ आणि पिचकाऱ्याच्या कल्पना सुंदर असून समर्पक वाटतात 'तसेच वसंतु नाते रितु पाउसाळी' ओवीतहि सुंदर अपन्हुति साधली आहे नरेंद्राने उपमेची देखील योजना आपल्या काव्यात केली आहे परंतु ज्ञानेश्वरीइतक्या फार मोठ्या प्रमाणात

नरेंद्राच्या काव्यात उपमा अलंकार आढळत नाही पुढील उपमेचे उदाहरण पहा –

'करुनि कस्तुरिचे वाफे लाविजति इंद्रनीळाची गोपे
तैसी वनाची निळी मातुळपे परिमळेंसी ॥"

येथे कस्तुरीच्या वाफ्यात इंद्रनीळ मण्याची गोपे लावण्याची कल्पना हृदयंगम वाटते

नरेंद्राची वर्णने जशी विस्तृत आणि रसाळ वाटतात तशीच समर्पक अलंकाराची योजना करण्यात त्याने आपली अभिजात कल्पनाशक्ति प्रकट केली आहे हे वरील विवेचनावरून लक्षात येईल नाथाना नरेंद्राइतके प्रतिभेचे ऐश्वर्य लाभले नाही त्याच्या काव्यात नरेंद्रासारखी सृष्टिवर्णने अथवा कल्पनावैभवाने नटलेली अलंकारिक रचना कमी आढळते द्वारकानगरीचे वर्णन, युद्धाचे वर्णन आणि लग्न सोहळ्याचे वर्णन—ही वर्णने नाथानी बरी केली आहेत त्यापैकी द्वारकावर्णनात

'आराम रमवी जीव शिवासी" प्रबोधपारणे घुमघुमती "

याप्रमाणे त्यात अध्यात्माचा रंग दिला आहे तसेच त्या नगरीचे सर्व दृष्टीनी श्रेष्ठत्व त्यानी व्यतिरेक अलंकाराने वर्णन केले आहे द्वारका ही कैलासवैकुंठाहून अधिक असून चिंतामणीची चिंता आणि कल्पतरूची कल्पना निवारण करते, असे नाथ म्हणतात तसेच –

"प्रेमे विकासले कमळ शुद्र । गुंजारवती कृष्ण-षट्पद ।
ऐकोनि गंधर्व जाहले स्तब्ध । सामवेद मौनावले ॥

अशी त्या नगरीची ख्याति होती द्वारकावर्णनापेक्षा युद्ध-वर्णन नाथानी बरेच विस्तारपूर्वक केले आहे या वर्णनासाठी

त्यानी पाच प्रसग खर्ची घातले आहेत हे युद्धवर्णन भागवत आणि हरिवश या ग्रथात आलेले आहे तथापि नाथानी आपल्या ग्रथात बराच विस्तार केला आहे शस्त्रास्त्राचा खणखणाट, रणगर्जना आणि रक्ताचे पाट याना या वर्णनात प्रमुख स्थान असल्यामुळे रौद्र आणि भयानक रसाची बाजू नाथानी बरीच साभाळल्या सारखी वाटते परतु या वर्णनानहि शेवटी शत्रुकडील योद्धयाना कृष्णाच्या हातून मृत्यु येणे फार सुखाचे वाटत असे असा आपला अभिप्राय देऊन नाथानी

"अधिकारिया मोक्ष भावो द्यावयालागी कृष्ण देवो ।
मिसे भीमकीचा विवाहो । रण निर्वाहो मोक्षाचा ।।

असा या युद्धाचा अध्यात्मपर निष्कर्ष काढला आहे त्यामुळे वर्णनाची गोडी कमी होऊन रसभगाचा दोष येतो तथापि लग्न सोहळ्याचे वर्णन रसाळ झाले आहे या वर्णनाला हरिवश आणि मूळ भागवत या ग्रथात फारसा आधार सापडत नाही परतु नाथानी आपल्या काव्यात लग्न प्रसगाची थोर इमारत रचिली आहे. ह्या लग्नसोहळ्यातील वऱ्हाडाच्या आगमनापासून वरपूजा सप्तपदि, लाजाहोम रुखवत, तेलवण, सूनमुख, धेडानृत्य इत्यादि तपशिलाचे विस्तृत वर्णन करून नाथानी कृष्ण रुक्मिणीच्या लग्नाच्या निमित्ताने स्वकालीन लग्न प्रकाराचे चित्र रेखाटले आहे आणि असे करताना कालविपर्यासाचा दोष त्याचे हातून नकळत घडला आहे कारण चिचुदऱ्या, हवाया, चद्रज्योति, हातनळे, फुलझाडे इत्यादि आतषबाजीचे प्रकार कृष्णाच्या काळात असणे शक्य नाही. त्याचा उदय मुसलमानकाळात झाला हे प्रसिद्ध आहे, उदाहरणार्थ –

अतिलोभाच्या चिचुंदरी । अग्नि लावूनी टाकिती दूरी ।
पेटत्या पडती जनावरी । उरीशिरी जाळिती ॥

तसेच क्रोधाचा भुईनळा, कामाचा हातनळा, अहंकाराचे वाण आणि निजतेज चंद्रज्योति असे निरनिराळ्या प्रकाराचे दारूकाम कृष्णाच्या लग्नात सोडण्यात आले या आतषबाजीवर हि नाथांनी आपली नेहमीची अध्यात्मांची रूपके देण्याची हौस फेडून घेतली आहे हे सांगणे नकोच तसेच तेलवणाकरिता आणि भोजनासाठी जे पदार्थ तयार करण्यात आले त्यांचे देखील वर्णन आतषबाजीप्रमाणे अध्यात्मपर केले आहे परंतु लग्नासाठी द्वारकेहून जे वऱ्हाड निघाले त्याचे वर्णन नाथांनी मोठ्या विनोदाने केले आहे प्राचीन मराठी काव्यात शुद्ध आणि सात्विक विनोद करण्यात नाथांची बरीच प्रसिद्धि आहे त्यात टवाळी किंवा ग्राम्यपणा आढळत नाही लग्नासाठी द्वारकेहून वऱ्हाड निघाले त्यावेळी अग्रपूजेचा अधिकारी गणराज याची स्वारी उंदिरावर बसली. अष्टमातृकांपैकी एक विंचवावर आरूढ झाली दुसरी तर सूकरमुखाच होती अशा ह्या चरबट वऱ्हाडणी आणि त्याहि पुढे चालल्या हे पाहून इतर वऱ्हाडी त्यांची कुचेष्टा करू लागले "ऐसियासी नेता वऱ्हाडे । व्याही हासती रोकडे ।
यासी राहवा मागिलेकडे । वऱ्हाड पुढे चालो द्या ॥

अशी दुसऱ्यांनी त्यांची निंदा केली त्यामुळे गणेशाने रागाने वऱ्हाडावर विघ्न आणले त्यांचे गाडे मोडले व घोडे पांगळे झाले महामातृका क्रोधायमान होऊन त्यांनी शीतज्वर सोडला त्यामुळे एकच गोंधळ झाला ही गोष्ट जेव्हा कृष्णाला समजली तेव्हा त्याने निंदकांची कान उघाडणी करून विनायक

आणि इतर देवता यांची स्तुति केली त्यांना नैवेद्य समर्पण केला तेव्हा वऱ्हाडावरचे विघ्न नाहीसे झाले असा हा वऱ्हाडाचा प्रसंग नाथांनी वर्णन करून सात्विक विनोद निर्माण केला आहे या प्रसंगाप्रमाणे कृष्ण रुक्मिणीला घेऊन द्वारकेस जाण्यासाठी निघतो त्यावेळी देखील नाथांनी आपल्या वर्णनात विनोद निर्माण केला आहे कृष्णदर्शनासाठी नागरिकांची गर्दी लोटते त्या गर्दीत एका सोवळ्या सन्याशाला एका वेश्येचा स्पर्श होतो तेव्हा सन्याशाचे पित्त खवळते व तो आपल्या हातातील सोटयाने तिला ठोकतो आणि तोंडाने 'विटाळ आम्हासी का केला" असे म्हणतो त्याला –" येरी हासोनि कपाळ पिटी ।

अजुनी क्रोध न सोडी पाठी ।

विटबिली दंड कासोटी । आत्मदृष्टी तुम्हा नाही

असा टोमणा देते

कोणत्याहि प्रसंगाचे अथवा घटनेचे वर्णन असो नाथ बहुधा त्या वर्णनावर अध्यात्माचा साज चढवितात हे आपण वरील विवेचनावरून अनेकदा पाहिले आहे या काव्यात तर इतर ग्रंथांच्या मानाने त्यांनी अशा प्रकारचे अलंकार योजण्याच्या बाबतीत पराकाष्टा केली आहे एरव्ही अध्यात्माची सृष्टि या नाशिवंत सृष्टीपेक्षा किती तरी पटीने श्रेष्ठ आणि व्यापक आहे परंतु अमूर्त असल्यामुळे अलंकारातील उपमानाला समर्पक अशा वस्तु त्या सृष्टीत कितीशा सापडणार ? त्याखेरीज या संसारात अशा अमूर्त वस्तूंचा प्रत्यय वाचकाला येण्याचा संभव कमी असल्यामुळे त्यावर आधारलेले अलंकार बुद्धीला चमत्कृतीचा साक्षात्कार घडवितात परंतु हृदयाला आनंद देत नाहीत कारण त्यांचे क्षेत्र मर्यादित असते. उदाहरणार्थ –

जीव शिव, वैराग्य, विवेक, श्रद्धा, शांति, सोहंभाव, शमदम कर्माकर्म इत्यादि उपमान वस्तु निरनिराळ्या प्रसंगी अनेकदा योजण्यात आल्या आहेत. एकदा श्रद्धेची भूक होते. त्याच श्रद्धेचे दुसऱ्या प्रसंगात "जैसी श्रद्धा आणि शांति। तैसी सुभद्रा आणि रेवती" असेहि वर्णन करता येते. तसेच प्रबोधाला पारव्याप्रमाणे धेंडा नाचविणाऱ्या माणसाचेहि उपमान होता येते. अध्यात्मसृष्टीतील उपमानवस्तूंच्या या मर्यादित संख्येमुळे कल्पनाशक्तीला आपले वैभव व्यक्त करण्याला वाव मिळत नाही. नाथांच्या रूपकांत या प्रमाणे तोचतोपणा आल्यामुळे त्यांची पुढील वर्णने कांही कांही वेळा कंटाळवाणी झालेली आहेत. नरेंद्राच्या काव्यांत सांग समस्त वस्तुविषय रूपकाची योजना फारच कमी प्रमाणांत आढळून येते. याच्या उलट नाथांच्या वर्णनांत त्यावर बराच भर दिलेला आहे. उदाहरणार्थ युद्धवर्णनांत रणनदीचे रूपक पहा. या रूपकावरून ज्ञानेश्वरीतील मायानदीच्या रूपकाची आठवण होते. तसेच रुखवत व आतषबाजी यांचे रूपकात्मक वर्णन पहा. त्यावरून नाथांच्या बुध्दिवैभवाची साक्ष पटते. रूपकाप्रमाणे उपमा आणि व्यतिरेक यांचीहि योजना नाथ समर्पकतेने करतात. द्वारकावर्णनांत हा व्यतिरेक अलंकार प्रामुख्याने दिसतो.

प्रत्येक प्रसंगाला अध्यात्माचा रंग देण्याचा हा नाथांचा स्वभावगुण या काव्यांत जो सार्वत्रिक दिसतो त्यासंबंधाने विशेषतः लग्नावर केलेल्या जीवाशिवाच्या रूपकाच्या कल्पने संबंधाने प्रो. न. र. फाटक आपल्या श्रीएकनाथ या ग्रंथांत असे सांगतात की " ही रूपकात्मक काव्य रचण्याची कल्पना नाथांनी मुसलमानांतील सूफी पंथाच्या साहित्यांतून घेतली असावी. जायसी हा एकनाथापूर्वी होऊन गेला असल्यामुळे नाथांच्या

काशीनिवासात या सूफी कवीच्या काव्याचा त्याच्यावर परिणाम झाला असावा

नाथाना सूफी पथ आणि त्याचे साहित्य याची कितपत माहिती होती हे समजण्यास आज त्याच्या ग्रथात आधार सापडत नाही दुसरे असे की अशा प्रकारची रूपकात्मक काव्य-रचना महाराष्ट्रात नाथानीच सुरू केली किवा त्याची एकटचाचीच आहे असे नाही नाथापूर्वी होऊन गेलेल्या काही मराठी सत कवीनी अशा प्रकारची रचना केल्याचा दाखला आहे उदाहरणार्थ –सेनान्हाव्याचा पुढील अभग पहावा –

आम्हीवारीक वारीक । करू हजामत बारीक
विवेकदर्पण आयना दावू । वैराग्य चिमटा हालवू
उदकशांति डोई घोळू । अहकाराची शेंडी पिळू
भावार्थाच्या बगला झाडू । कामक्रोध नखें काढू
चौवर्णा देऊनी हात । सेना राहिला निवात

सेनान्हाव्याप्रमाणे नरहरी सोनाराने देखील आपल्या धद्यातील उपकरणावर अध्यात्माचा रग चढविला आहे तेव्हा आपल्या साप्रदायातील पूर्वसूरीचे अशा प्रकारचे साहित्य पुढे असताना नाथाना सूफी पथाची उसणवारी करण्याचे काय प्रयोजन होते हे समजणे कठीण आहे

असो रुक्मिणी स्वयवरावर उपलब्ध असलेल्या मराठी कृतीपैकी नरेंद्र आणि एकनाथ याच्या ग्रथातील काव्यगुणासबधाने वर विवेचन करण्यात आले आहे दोघे कृष्णभक्त असूनहि प्रत्येकाची प्रकृति आणि दृष्टिकोण याच्या भिन्नत्वामुळे त्याच्या रचनेत अतर पडलेले दिसते नरेंद्राची भक्ति सौदर्यप्रधान आहे याच्या उलट नाथाची दृष्टि बोधप्रधान

आहे त्यामुळे रसपरिपोष आणि कल्पनाविलास या काव्याच्या प्रमुख घटकाकडे लक्ष देऊन नरेंद्राने आपली कलाकृति निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे याच्या उलट "या लागी करिता गुरुभक्ति प्राप्त होईजे भागवतार्थी । तेथे काव्यादि व्युत्पत्ति । नाना युक्ति किमर्थ" अशी नाथाची निष्ठा असल्यामुळे त्यानी अध्यात्म आणि भक्ति या गोष्टीवर जास्त भर देऊन रसालंकाराना गौणस्थान दिले आहे परंतु दोघेहि थोर सरस्वती भक्त होते वाग्देवीची त्यानी केलेली सेवा महाराष्ट्राला मान्य झाली आहे नाथानंतर सामराज विठ्ठल इत्यादि कवीनी आपापल्या शक्तीप्रमाण स्वयवराची कथा आळविली परंतु नाथाची लोकप्रियता आजहि अढळ आहे. याचे कारण त्याचे विभुतिमत्व तर आहेच पण त्याखेरीज त्यानी आपल्या काव्याला ओज, उच्च-विनोद, बहुजनसमाजाला रुचणारी आणि पटणारी प्रासादिक भाषाशैली आणि अध्यात्मीक रूपके याचे जे लेणे दिले आहे त्यामुळ त्याचे स्थान प्राचीन मराठीवाङमयात कायम आहे नाथाची ही लोकप्रियतेची पुण्याई नरेंद्राला लाभली नाही याचे कारण ज्या महानुभाव पथाने त्याचे काव्य रक्षण करून गुप्त ठेवले त्या पथाला विशिष्ट आचारविचारामुळे बहुजनसमाजात लोकप्रियता लाभली नाही त्यामुळे काव्यगुण असूनहि नरेंद्राचे रुक्मिणीस्वयवर अज्ञातच राहिले आज ती स्थिति राहिली नाही यापुढे नाथाप्रमाणेच नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयवराचे स्वागत विद्यापीठातील विद्यार्थीच नव्हे तर बाहेरील रसिकवर्गहि करील अशी आशा आहे

---

हातनूर येथील

# यादवकालीन मराठी शिलालेख

सेलू येथील माझे स्नेही श्री रामचद्र गोविद काटे वकील यानी आठ ओळीचा प्रस्तुत शिलालेख माझ्या नजरेस आणिला ज्या हातनूर गावी हा शिलालेख उपलब्ध झाला तो गाव हैद्राबाद सस्थानातील सेलू स्टेशनापासून चार मैलाच्या अतरावर दुधना नदीच्या उत्तर तीरावर वसलेला आहे गावालगतच एक जुने महादेवाचे देऊळ आहे देवळासमोर एक मोठी विहीर असून सभोवती दगडी कपाउडवजा भित आहे प्रस्तुत शिलालेख देवळाच्या सभामडपात प्रवेश करताना डाव्या खाबावर कोरलेला आढळतो सभामडपाचे शिल्पकाम फार प्रेक्षणीय असून यादवकालीन शिल्पकलेचा एक उत्कृष्ट नमुना आहे

लेखाचे ठसे घेण्यासाठी माझ्या जवळ त्यावेळी शाई ब्रश डॅबर इ कोणतेहि साहित्य नसल्यामुळे जमाखर्च लिहिण्याचा कागद आणि कोळशाची पूड यावर काम भागवावे लागले, परतु शिलालेख सुस्थितीत असल्यामुळे अक्षरे बरी निघाली याकामी श्री काटे यानी बरेच सहाय्य केले समोरील पानावरील ब्लॉक मूळ लेखाच्या सुमारे एक पचमाश आहे

**अक्षरवटिका** —या लेखाची लिपी देवनागरी असून अक्षराचे वळण बाराव्या शतकातील इतर शिलालेखाप्रमाणेच आहे लेखातील ॐ आणि चा ही अक्षरे सोडल्यास बाकीच्या

अक्षरांचे वळण आधुनिक वळणासारखे वाटते पृष्ठमात्रेचा कोठेहि उपयोग केलेला नाही

या लेखात शके १२२३ मध्ये प्लव सवत्सरात पुरुषदेव नावाच्या पडिताने नागनाथाचा प्रसाद (प्रासाद–देवालय) केला व त्याची वृद्धि केली ( जिर्णोद्धार केला ) असे सागितले आहे सवत्सराच्या अनुक्रमावरून व कालगणने-वरून पहाता शके १२२३ या वर्षी प्लव सवत्सर येते. सवत्सरानतर सामान्यत मासतिथिवार याचा उल्लेख असतो परतु प्रस्तुत लेखात त्याचा नामनिर्देश नाही तसेच ज्या राजाच्या कारकीर्दीत किवा कृपा-छत्राखाली हे देऊळ बाधले गेले त्याचा उल्लेख नाही वस्तुत रामदेवराव यादव हा त्यावेळी देवगिरीच्या गादीवर होता देवालय बाधणारा पुरुषदेव पडित कोण होता हे लेखातल्या अपुऱ्या माहितीवरुन निश्चितपणे सागणे कठिण आहे परतु अलिकडे निजामराज्यात पुरूषोत्तमपुरी ह्या गावी रामदेवराव यादवाचा एक ताम्रपट सापडला आहे त्यात पुरूषदेव असे त्याच्या शके १२३२ मधील मुख्यप्रधानाचे नाव आढळते ह्या पुरुषदेवाशी या देवालयाच्या कर्त्याचा सबध जोडावासा वाटतो

या देवळासाठी योजलेल्या सुताराचे नाव हरिदेव असे होते. सुतार हे सुत्रधार = (शिल्पि) ह्याचे मराठी रूपातर आहे

## वाचन

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | ॰ सकु १२२३ प्ल | (२) | व स्वंच्छरे पुरुषु |
| (३) | देऊ॰ पडिति ना | (४) | गनाथाचा प्रस (सा) |
| (५) | दु केला व्रिध्हि के | (६) | लि सुतारु हा |
| (७) | रिदेऊ॰ नागना | (८) | था नमस्तु ।। |